सघ तरफथी सव जमण थयु पू गुरुदेवना सवारना प्रवचनथी जनसमूह अेटलो प्रभावित थयो के बपोरे बीजु प्रवचन राखवु पड्यु आ गाममा श्री अभिनदन स्वामिनु शिखरबधी जिनमदिर छे त्रीजो मुक्काम इस्लामपूरमा करीने चोथो मुक्काम पडवलवाडीमा एक प्रशात उपवनमा थयो आ सघमा सातारांना स्थानकवासी सप्रदायना श्रेष्ठिवर्य काळीदासभाई, कराडना वोहोरीसमाजना रतनशी भीमजी खोजा आदि विविध धर्मोनी व्यक्तीओ सामेल थई हती दररोज यात्रिओनी सख्या वधती जती हती आ सिवाय सघना दर्शन करवा तथा पू गुरुदेवना प्रवचनो साभळवा तुग, डिग्रज, सागली, गोटाखिडी विगेरे गामोना जैनजैनेतर लोको दररोज आवता हता आ मुक्काममा सागलीना श्री बलवतराव चदाप्पा धावते, गणपत रावजी गोडबोले वकील, आणाप्पा गातापा कर्वे विगेरे कार्य कर्ताओ आवी गया पाचमो मुक्काम मिरजवाडीमा थयो- छठो मुक्काम डिग्रजमा थयो स्थले स्थले ग्रामजनोए अत्यत उत्साहथी सघनु स्वागत कर्यु

७ ने ८ मो मुक्काम सागली शहेरनी एक विशाल जग्यामा थयो त्या महावीरनगरनी रचना करवामा आवी त्यानी जनताए आत्मीयताथी सघनु स्वागत कर्यु आ शहेरमा पूज्यश्रीना व्याख्यानो बजार भागमा थया सागली जैन श्वे सघे नवकारशीओ करी हती

चादीनो रथ, निशान डका, हाथी, नानुभाई झवेरी सुरतकरना बेन्डसाथे सघ ठाठमाठथी जयसिगपुर गयो

त्याना रेल्वे स्टेशन नजीक आवेला गाधी सखाराम देवचदना मळामा मुक्काम कर्यो त्या धर्मनाथ प्रभुनु एक नूतन जिनालय बाध्यु हतु तेनु उद्घाटन विधिसहित स्थानिक सघ तथा यात्रिक सवनी हाजरीमा पूज्यश्रीनी निश्रामा थयु दशमो मुक्काम १ण त्या थयो ११मो मुक्काम दानोळीमा थयो त्या अमदावाद निवासी शेठश्री बकुभाई मणीलाल तरफथी नवकारशी थई आ सर्वे मुक्कामोमा देवपूजा, स्नात्र महोत्सव, गुरुदेवना प्रवचनो, भावना विगेरे कार्यक्रम आनद अने उल्हासपूर्वक थतो हतो दानोली पछी सघे पोतानो मुक्काम श्री कुभोजगिरि तीर्थनी तळेटीमा कर्यो तेज स्थले आजे एक विशाल धर्मशाळा उभी छे

श्री कुभोजगिरि तीर्थपरना जगवल्लभ पार्श्वनाथ प्रासादनी प्रतिष्ठा वि स १९२६ महा शुद ७ सोमवारे थई हती सघना आगमन वखते आ तीर्थनी आर्थिक स्थिति सारी न्होती आ तीर्थनी व्यवस्था करवानी कामगिरि कोल्हापुरना शेठ हुकमीचदजी डुगाजी राठोड, बाबुभाई परमार, पुनमचदजी गाधी, पानाचद मोतीचद विगेरेए स्वीकार्याने थोडोज समय थयो हतो सघ आववा पहेला श्रीयुत कडीआ, बापालालभाई विगेरेए कोल्हापुर जई त्याना सघने छ'री पाळता सघनी खबर आपी आर्थिक सकट होवा छता तीर्थ कमीटीए अनेरा आनदथी आ सघनु स्वागत कर्यु

आ कुभोजगिरि तीर्थमा सघनो त्रण दिवस सुधी मुक्काम हतो वि स १९९४ महा वद १३ सोमवारे ता २८-२-१९३८ ना दिवसे गिरिपर समवसरणनी रचना करी वडुथकर कुटुबवती शेठ शीवलालभाई अने तेमना धर्मपत्नी मगुबेन तेमज श्री मोहनलाल भाईने पू गुरुदेवे केटलाक नियमो आपी विधिपूर्वक सघ

तरफथी तीर्थमाळ पहेरावी सघवी ५द अर्पण कर्यु आज प्रसगे कोल्हापुरना शेठ हिन्दुमलजी जितराजजी राठोड अने तेमना धर्मपत्नी सौ कान्ताबेने तीर्थोद्धारने पूरक थवा माटे मोटी रकमनो चडावो लीधो तेथी ते दपत.ने पण तीर्थमाळ पहेरावाई आ निमित्ते जिनप्रासाद उपर ध्वजा चडाववी एवो विचार आव्यो ते वखते प्रथम लीधेल ध्वजाना चडावाना हकनु शु ? एवो प्रश्न उपस्थित थयो ते वखते पूज्य गुरुदेवे विवेचन कर्यु के "आपणे जेवी रीतीए दररोज स्वच्छ नवा कपडा पहेरीअे छीये ते प्रमाणे प्रभु प्रासाद उपर दररोज नवी ध्वजा चडाववी जोइए प्रभुप्रासाद उपरनी ध्वजा मेली थेली अथवा फाटेली न होवी जोइए पछी ते दिवसे नवी ध्वजा चडाववानो चढावो कोल्हा-पुरना श्रेष्ठिवर्य बाबुभाई परमारे लई प्रासाद उपर ध्वजा चढावी आ वखते लगभग पाच हजार लोकोनी हाजरी हती

पछी वर्षोरना सर्वजनो महावीर नगरमा आव्या पछी नूतन सघवीओनो वरघोडो हाथी उपरथी नीकळ्यो सघवीओअे मुक्त हाथे वरसी दान आप्यु आवी रीते महाराष्ट्रना प्रथम छऽरी पाळता सघनु चौद दिवसनु अखड धर्मसत्र आनद उत्साह अने निर्विघ्नपणे पूज्यश्रीना आशीर्वादथी पार पड्यु

आ समये कोल्हापुरना श्री नेमचद विठ्ठलचद शाह ना प्रयत्नथी छत्रपति श्रीमद राजाराम महाराजनी सारी एवी सहाय मळी

आ धर्मसत्रनु घणु दूरगामी एवु परिणाम आव्यु जैनेतरोमा मास मदिरानो त्याग, ब्रह्मचर्य पालन वगेरे व्रतो लेनार महानुभावोनु प्रमाण घणु हतु महाराष्ट्रमा धर्म जागृति आवी श्री कुभोज गिरितीर्थनी घणी प्रसिद्धि आ निमित्तथी थई अने आ तीर्थनो सारो एवो विकास थयो सवेगी साधु केवा होय छे तेनु प्रत्यक्ष दर्शन थयु भारतना भिन्न भिन्न प्रदेशना लोको तीर्थयात्रा करवा आववा लाग्या

सवेगी साधुसाध्वीओनो इतिहास ज्वलत छे सर्व समाजने धर्मोपदेश आपी, तेने कर्म मुक्त करवा माटे तेमणे अथाग श्रम लीधेलो छे समाजजीवननु नैतिक धोरण उच्चतम रहीने ते धर्माभिमुख रहे ते माटे तेमना अहर्निश प्रयत्न चालु होय छे कलात्मक गगनचुबी भव्य जिना-लयो, तीर्थोनो जीर्णोद्धार, यात्राना निमित्तथी सघसचार, ग्रथोनी निर्मिती विगेरे कार्यो तेमणे आपेला स्फुर्तिदायक उपदेशमाथी निर्माण थाय छे अने निर्माण थयेला छे

पू प्रा आचार्य देवेश श्रीमद् विजय रामचद्र सूरीश्वरजी महाराज तथा तेमना शिष्य समुहना द महाराष्ट्रना आगमनथी अने विहारथी धर्म जागृतिनु महान् कार्य थयु तेमना आ विहारथी महाराष्ट्रमा साधुसाध्वीओनो विहार अव्याहतपणे शरु थयो

कोल्हापुर श्रीसघनी आग्रहभरी विनती अनुसार पू पा आचार्यदेव पोताना शिष्यो साथे वडगाम मार्गे श्री कुभोजगिरिथी कोल्हापुर पधार्या तेमना हस्ते बीजु एकाद महान् कार्य थाय ए कुदरतनी इच्छा हती के शु ? कोण जाणे ?

कोल्हापुर लक्ष्मीपुरीमा श्री मुनिसुव्रतस्वामिनु शिल्पकलामय, नयनरम्य मदीर अनिअल्प काळमा पू. गुरुदेवना उपदेशथी थयु अने तेनो अजन-शलाका प्रतिष्ठा महोत्सव पूज्यश्रीनी निश्रामाज थयो ते घटना ऐतिहासिक थई छे

* * *



प्राचीन तीर्थ ओसीयाजी ( राजस्थान )

यह मंदिर बहुत पुराना अर्थात् भगवान महावीर के निर्वाण के ७० वर्ष पश्चात् श्री रत्नप्रभसूरि द्वारा प्रतिष्ठा कराया हुवा है। स्तंभ और तोरणकी कोरणी भाग्य है।

श्री कुंभोजगिरीमण्डन

# श्री पार्श्वजिन संस्कृताष्टकम्

रचयिता पू मुनिश्री पुण्यविजयजी महाराजना शिष्य मुनिश्री वीरसेनविजयजी महाराज
(आदोनी स २०२५)

सुवामासन्तानं विभवसदन शान्तवदन
भवाब्धौ सद्यानं सुकृतजनन मोक्षनयनं ।
गतं मुक्तिस्थानं प्रशमभवनं पार्श्वपजिनं
नयेऽहं सुध्यान जगति तपनं तं प्रतिदिन ॥ १ ॥ कमलबंध । शिखरिणी

नाथोऽनाथानां पार्श्वनाथो नराणाम्
श्रीपार्श्वः पार्श्वं स्तौति नित्यं जिनेन्द्रम् ।
अर्हन्पार्श्वेन स्थापितो जैनधर्मं
पार्श्वायाप्ताय स्वस्ति देवाय तुभ्यम् ॥ २ ॥

श्रीपार्श्वान्नाथात् सर्वथा कर्ममुक्तम्
पार्श्वस्य स्वर्गे विस्तृता शुभ्रकिर्तिः ।
श्रीपार्श्वे सार्वे संस्थिता भूरिभूतिः
हे पार्श्वस्वामिन् देहि कैवल्यलक्ष्मीम् ॥ ३ ॥ वैश्वदेवी

जगवल्लभ संज्ञक पार्श्व विभु
शिवदं सतत प्रणमामि नतः ।
जगतामध मेघ हृतो पवन
भवसागरतारणयानसमं ॥ ४ ॥ तोटक ।

विविधाभिधानशाली, स· पुरुषादानीय नामकर्मण.
शोभते पार्श्वप्रभु., शंखेश्वरान्तरीक्षादौ च ॥ ५ ॥ आर्या

कुंभोजस्थे शैलप्रस्थे चैत्ये रम्येऽलंकाराभम् ।
मर्त्यामर्त्यव्रातो भक्त्या, पार्श्वं देवं नित्यं स्तौमि ॥ ६ ॥

श्री पार्श्वस्य ध्यान ध्यात्वा, जाप कृत्वा पूजा सृष्टवा ।
स्वेप्सां पूर्ति भक्तव्राताः, क्षिप्रक्षिप्रं ते कुर्वन्ति ॥ ७ ॥

पार्श्वस्वामिन् । ते पद्मास्य, लुब्ध्वा याता भक्ता भृङ्गा ।
आस्य द्रष्टुं मे भावोऽस्ति, कस्मिन्काले यत्तल्लप्स्ये ॥ ८ ॥ विद्युतमाला ।

# निपाणीथी कुंभोजगिरी तीर्थनो

निवेदक श्रेणिककुमार रसिकलाल शाह B Sc (Hons) पुणें कॅम्प.

# छ'री पाळतो चतुर्विध संघ

वात छे वि स २०२० नी सालनी कराडमा पू साधुमहाराजोनु चातुर्मास थये वार वर्ष व्यतित थई जवाथी आ साल कराडमा पू साधु-महाराजोनु चातुर्मास कोइपण भोगे करावबु आवी भावना कराड जैन युवक मडळनी तीव्र बनी तेथी सघ समतियी जैन युवक मडले बारामतीमां विराजमान परमपूज्य पन्यास प्रवर श्री तिलकविजयजी गणिवरना शिष्य परम पूज्य पन्यासप्रवर श्री रजनविजयजी गणिवर्य तथा मुनिश्री भद्रानदविजयजी म पासे जई आ साल आप कराड चातुर्मासार्थे पधारो अेवी साग्रह विनती करी पू गुरुदेव पण तेमनी भावना सत्कारी कराड चातुर्मासार्थे पधार्या तेओश्रीनी वैराग्य, त्यागमय वाणीनो प्रवाह एवो वहेवा लाग्यो के जेना प्रभावे अनेक प्रकारनी आराधनाओ, अभूतपूर्व तपश्चर्याओ, शान्तिस्नात्र, प्रभुप्रतिष्ठा, सिद्धचक्र वृहत्पूजन, ऋषिमडल महापूजन आदि शासन प्रभावनाना कार्यो थवा लाग्या आराधनाना अद्‌भूत समाचारो आखा महाराष्ट्रमा प्रसरता कोल्हापुर,निपाणी, सागली, बेलगाम, बीजापुर आदिना सघोअे स्व स्व गाममा पधारी लाभ आपवा माटे विनती करी.

पू. गुरुदेवे पण लाभालाभ जाणी महाराष्ट्रना गामोतरफ पोतानो विहार लवाव्यो तेओश्रीना प्रभावी प्रवचनो द्वारा स्थले स्थले दोढमासी, मासक्षमण, सोळ, अठ्ठाई आदि महान तपश्चर्याओ, माधवनगरमा अमीझरा वासुपूज्य जिन मदिरनो प्रारभ, प्रथमजवार महाराष्ट्रमा कुभोजगिरिपर जैन धार्मिक ग्रीष्म शिबिरनु आयोजन, नवपदजीनी आराधना, प्रभुप्रतिष्ठाओ, दीक्षाओ, शान्तिस्नात्र, सिद्धचक्रबृहत्पूजन, ऋषिमडलमहापूजन, अर्हद्‌महापूजन आदि अनेक प्रकारना शासनप्रभावक कार्यो थवा लाग्या

सं २०२१ ना निपाणीना चातुर्मासमा पर्युषणपर्वप्रसगे श्रावकोना वार्षिक ११ कर्तव्योना वर्णन समये तीर्थ यात्रानु वर्णन आवता पू गुरुदेवे फरमाव्यु के तीर्थ यात्रा करवाथी आत्मा लघुकर्मी बनी शीघ्र मोक्षगति पामे छे तीर्थ ए आत्माने तरवामाटे परम साधनभूत छे माटे वर्षमा एकवार तो तीर्थ यात्रा अवश्य करवी जोइए पोते तीर्थयात्रा करवी जेम लाभदायिक छे, तेम अन्यने पण तीर्थयात्रा करावनार आत्मा तीर्थंकर नामकर्म उपार्जन करे छे ते पण विधिपूर्वक उल्लास सहित छ'रि पाळता करवी

अत्यत हितकारी छे १ सचित्तनो त्याग (सचितहारी) २ एकासणु (एकलआहारी) ३ पगे चालवु (पदभ्याचारी) ४. भूमिशयन (भूमिशय्याधारी) ५ ब्रम्हचर्यव्रतपालन (ब्रम्हचारी) ६ सम्यक्त्वनु धारण करवु (सम्यक्त्वधारी). आ छऽरी जन शासनमा वतावेल छे

आवा छऽरि पाळता सघनी परपरा आ चोविशीना प्रथम तीर्थंकर श्री ऋषभदेवना प्रथम पुत्र महाराजाधिराज श्री भरतचक्रवर्तीथी चालु छे जावडशाहशेठे दशपूर्वधर पू श्री वज्रस्वामिजीना सदुपदेशथी, विक्रम सवत चलावनार श्री विक्रमनृपतिए पू आचार्यदेव सिद्धसेनसूरीश्वरजीना सदुपदेशथी, प पू कलिकालसर्वज्ञ आचार्यश्री हेमचद्रसूरीवर म ना सदुपदेशथी परमार्हत कुमारपाल भूपाले तेमज बीजा अन्योए पण पूर्वकालमा श्री शत्रुजय महातीर्थना छऽरि पाळता सघो काढ्या हता

वर्तमानकाले पण अमदावाद निवासी श्रेष्ठिवर्य श्री माणेकलाल मनसुखभाईए श्री गिरनार-सिद्धाचल महातीर्थनो सघ पू आ म विजयनेमिसूरीश्वरी म ना सदुपदेशथी काढयो हतो तेवीज रीते तेओश्रीनी प्रेरणाथी शेठ पोपटलाल धारसीभाई जामनगरवालाओ श्री गिरनार-सिद्धाचल महातीर्थनो सघ काढयो हतो पाटण निवासी धर्मप्रेमी शा नगीनदास करमचदे कच्छमा आवेल भद्रेश्वर महातीर्थनो सघ काढ्यो हतो आ बधा सघो पण छऽरि पाळता सघो हता

आवु छऽरि पाळता सघनु महात्म्य, फळ साभळी निपाणी निवासी शेठ स्व मोहनलाल वालचदना सुपुत्र श्री चदुलाल मोहनलाल तथा तेमना धर्मपत्नी चदनबेनने पण निपाणीथी कुभोजगिरि तीर्थनो छऽरि पाळतो सघ काढवानी भावना पेदा थई.

पू. पन्यास श्री रजनविजयजी गणिवर आदि ठा. ३नु स २०२२ नु चातुर्मास कोल्हापुर थता त्यानी जुदी जुदी तपश्चर्या प्रसगे श्रीयुत चदुलाल मोहनलाल अवार नवार कोल्हापुर जता पू. गुरुदेवनो चातुर्मास बाद बीजी तरफ विहार साभळी श्रीयुत चदुलालभाई, तेमनी धर्मपत्नी चदनबेन, तेमना सुपुत्र वर्धमानकुमार विगेरे अमलनेरवाळा सेवाभावी रीखवदासभाई साथे कोल्हापुर आव्या, अने विनती करी के शेठ देवचदभाई छगनलाल सघप्रमुख सतकुमारभाई भोगीलाल वि सकल सघनी अनुमतिथी अमोए निपाणीथी कुभोजगिरिनो छऽरि पाळतो सघ आपश्रीनी निश्रामाज काढवानो निर्णय कर्यो छे माटे आप निपाणी पधारो

पू गुरुदेवे जवाब आप्योके तमारी भावना घणीज उत्तम छे परतु जैन शासनमा चतुर्विध सघनु स्थान घणुज उचु छे, जे पोते तीर्थस्वरुप छे

एनी स्थापना **सवि जीव करु शासन रसी** अे प्रकारनी उच्चकोटीनी भाव दयाथी प्रेराई, त्रीजा भवे तीर्थंकर नामकर्म उपार्जन करी, अने वीश स्थानक तप द्वारा तीर्थंकरनामकर्म निकाचित (दृढ) करी, अतिम भवमा सर्व ससार बधनोने तोडी नाखी, चारित्रग्रहणकरी, बावीश परिषहो सही, उपसर्गोनो सामनो करी, चारघाती कर्मनो नाश करी केवळ ज्ञान पामी प्रथम देशना समये तीर्थंकर महाराजाए करी छे

चतुर्विध सघ अेटले १ साधु, २ साध्वी, ३ श्रावक अने ४ श्राविका

१ साधु - सर्व ससारी सबधोने मन वचन कायाथी फगावी दई फक्त आत्माना कल्याण माटेज सर्वथा हिसानो त्याग, सर्वथा असत्यनो त्याग, सर्वथा चौर्यनो त्याग सपूर्ण ब्रह्मचर्यनु पालन, सर्वथा परिग्रहनो त्याग ए पच महाव्रत धारणकरी, बेतालीस दोष रहित गौचरी (भोजन) द्वारा जीवन जीवी, निरतर स्वाध्याय, ज्ञान ध्यानमा लीन रही आत्मसाधनाना अजोड मोक्ष मार्गना मुसाफर, जैन शासनना प्रभावक तेमज भव्यजीवोने मोक्षमार्गमा जोडनार साधुओ जाणवा

२ साध्वी - उपर मुजब सयम, आराधक, प्रभावक, उपदेशक अने मोक्षमार्गना मुसाफर स्त्रीवर्ग रुप साध्वीओ जाणवा

३ श्रावक - सयम मार्गना परम अभिलाषी परतु सयम ग्रहणकरवामा अशक्तिना कारणे (साधुनी अपेक्षाए पाचनानी प्रतिज्ञाओ त्रणगुण-व्रत अने चार शिक्षाव्रत रुप) श्रावकना बारव्रत धारक, श्रमण सस्थाना उपासक, दानादिगुणयुक्त, शक्ति मुजब तप, जपना आराधक, स्वदारासतोष अने परस्त्रीना त्यागी अेवा श्रावको जाणवा

४ श्राविका - जैनकुळभूषणरुप, ज्ञानी, तपस्वी चारित्री आदि आराधकोनी खाणरुप श्रावकव्रत-ना धारक, शियलादिगुणोथे अलकृत एवी श्राविकाओ जाणवी

छ'रि पाळता सघमा आवा चतुर्विध सघनो योग होय तो वधारे लाभ मळे माटे आ बाबतपण विचार करवा जेवो छे

श्रीयुत चदुलालभाईनो भावोल्लास जागत थता मुबईमा विराजमान प पू व्याख्यान वाचस्पति आचार्यदेव विजय रामचद्रसूरीश्वरजी महाराज ना आज्ञा वर्ती पूनामा चातुर्मास विराजमान् पू. साध्वीजी जयाश्रीजी महाराजने विनतीकरी तेमना शिष्यामाथी त्रण साध्वीओने सघमा मोकलवानु तेओश्री नक्की करी आव्या

- प पू पन्यासप्रवर श्री रजन विजयजी गणि-वर, पू मुनिराजश्री भद्रानद विजयजी महाराज तथा मुनिश्री सुयश विजयजी महाराज आदि ठा ३ तेमज पू साध्वीजीश्री वनमालाश्रीजी महा-राज पू सा श्री चद्रोदयाश्रीजी महाराज अने पू सा श्री उप प्रभाश्रीजी महाराज आदि ठा ३ निपाणी पधारता तेओश्रीनी निश्रामा सवत २०२३ मागसर शुद १० गुरुवारनो सघ प्रयाण माटे नक्की करी गाम, बहारगाम सघ आमत्रण पत्रिका मोकलवामा आवी महाराष्ट्रमा आवो छ'रि पाळतो चतुर्विधसघ प्रथमज होइ लोकोनो उत्साह अपार हतो

मागसर शुद १० गुरुवार शुभसमये पू गुरुदेवो पू साध्वीजीओ, सघवी चदुलालभाई, तेमना-धर्मपत्नी चदनबेन, तेमनो सर्व परिवार, गामना आगेवानो, २५० सघयात्रिको, अन्य साजन महा-जन, तेमज सुदर शणगारेल मोटारमा चादीना त्रिगडामा विराजमान् शान्तिनाथ भगवतनी प्रतिमा साथे बेन्डना मधुर नाद पूर्वक सघनु प्रयाण थयु

प्रथम जिनमदिरमा चैत्यवदन कर्याबाद स्थले स्थले सर्व भाईश्री गणपतलाल, चदुलाल अने मोतिलालनु स्वागत पूर्वक गामबहार श्री वेणी-चदभाई मोहनलालना नवा मकानमा मगला-चरण करी, थोडी स्थिरता करी त्या वेणीचद-भाई तरफथी सघनी नास्तानी भक्ति करवामा आवी प्रथम मुक्काम पछी सादलगा पधारता चैत्यवदनादि कार्यक्रम थयो आजे निपाणी निवासी शा शिवरामभाई बापुचद तरफथी सघ जमण थयु

बीजो मुकाम माग शु ११ दिने सघ कागल पहोच्यो त्यां गृहमदीरमा श्री नमिनाथ भगवत ना दर्शन चैत्यवदनादि करी सरकारी रजवाडाना मकानमा सघ उतारे गयो त्या पण चैत्यवदनादि कर्या आजे कागल जैन सघ तरफथी सघ जमण हतु आजे मौन एकादशी होवाथी आराधना पण ठीक थई हती

त्रीजो मुकाम मा शु १२ दिने कोल्हापूर सघ गयो त्यानो उतारो श्री गुजराती शाळामा हतो आजे शाहुपुरी सघ तरफथी सघ जमण हतु मागसर शु १३ लक्ष्मीपुरी तथा गुजरी सघ तरफथी सघ जमण हतु

चोथो मुकाम मागसर शु १४ दिने सघ रुकडी पहोच्यो आजे सघजमण निपाणी निवासी शा सखाराम नेमचद तरफथी हतु आजे उतारो रुकडी ट्रेनीग कोलेजमा हतो वकील नेमचदभाई सखाराम शाहे सारो सहकार आप्यो हतो सघना प्रवासमा बेलगाम, निपाणी, कणगला कागल, इस्लामपूर, सिरोली, कोल्हापूर इचलकरजी, सागली, माधवनगर, विटा वगेरे सुधीना श्रावक श्रेष्ठिवर्यो तेजम आजुबाजुना गामोमाथी जैन जैनेतर समाज ते सघ, गुरुमहाराज, तेमज देवदर्शन माटे अवारनवार आवता जता हता आखो दिवस गर्दी हती

वळी आजे कोल्हापूरथी बाबुभाई परमार, बाबुभाई सघवी, पुनमचदजी गाधी, हुकमीचदजी डुगाजी, मणीभाई देवसी वसा, सोनमल गाधी, भिमराज गुदेचा, इचलकरजीथी चदुलाल लालचद, फुलचद रुपचद, जयसिगपुरथी मुरजमल प्रागाजी, सागलीथी रतनशी जेठाभाई, आर टी, शाह, शान्तिलाल रेठरेकर, कुभोजगिरितीर्थ कमीटीना सभ्यो कराड निवासी हिराभाई पदमसीभाई पू गुरुदेव तथा सघना दर्शनार्थे आव्या हता

पाचमो मुकाम मा शु १५ रुकडीथी सघ इचलकरजी पहोच्यो आजे त्याना नूतन उपाश्रयनु उद्घाटन पु गुरुदेवोनी निश्रामा अने सघवी चदुलालभाई ना हस्ते थयु आजे सघ जमण इचलकरजी सघ तरफथी हतु

छठ्ठो मुकाम मा व १ कुभोजगिरि तळेटीऍ ( बाहुबली ) सघ पहोच्यो आजे कुभोजगिरिना तेमज श्री जगवल्लभ पार्श्वनाथ भगवानना दर्शननो लाभ मळशे एथी सघमा सर्वने उत्साह अपार हतो कुभोजगिरितीर्थ कमिटि तरफथी बेलगामनिवासी श्री चतुरभाई नगीनदास, सागली निवासी रतनशी -- जेठाभाई, शान्तिभाई रेठरेकर, कोल्हापुर निवासी बाबुभाई परमार, सोनमलजी गाधी, भीमराज गुदेचा, बाबुभाई वनाजी सघवी, मणीलालभाई वसा विगेरे सघनु सामैयु करवा हाजर हता त्याना दवाखानाथी वाजते गाजते भव्य सामैयु थयु अने सघ तरतज कुभोजगिरिपर श्रीजगवल्लभ पार्श्वनाथ दादाना दर्शने पहोच्यो भावभर्या हैये दर्शन-पूजन चैत्यवदनादि करी तळेटीनी धर्मशाळामा आव्यो ते दिवसे बहारगामथी बीजा पण बे हजार यात्रिको आव्या हता ते दिवसे सघवी तरफथी सघभक्ति थई

मा व २ गुरुवारे एक शणगारेल भव्य मडपमा तीर्थमाळा सबधी विधियो प. पू प श्री रजन विजयजी गणिवर आदि चतुर्विध सघनी हाजरीमा चादीनी नाण समक्ष श्रीयुत् चदुभाई तेमज तेमना धर्मपत्नी चदनबेन विगेरे सघवीओने तीर्थ माळनो विधि करावबामा आव्यो पू गुरुमहाराजे सघपतीनी फरज अे पर टुकु

विवेचन कर्यु शुभमूहूर्ते मुबई निवासी बेरिस्टर माणेकचद भायचद व्होराए तीर्थमाळ पहेरावबानी उछामणी बोली सघवी चदुलालभाई तथा मघवणचदन बेनने तीर्थमाळ पहेरावाई, तथा बीजी पण तीर्थमाळाओ पहेरावाई

रात्रे श्री कुभोजगिरि कमिटि तरफथी शेठ चतुरभाई, रतनशीभाई, शान्तिलालभाई विगेरे ममयोचित प्रवचनोकरी सघवी चदुलालभाईने मानपत्र अर्पण कर्यु आजे निपाणी शेठ देवचदभाई छगनलाल शाह तरफथी सघ जमण हतु, मा व ३ मघ स्वस्थाने पहोच्यो

आ मघमा मवारसाज प्रतिक्रमण, दर्शन, वदन, पूजन, मोटीपूजा, भावना विगेरे कार्यक्रम हतो, रोज 'तीर्थयात्राना लाभअपार' ए पर पू गुरुदेवनु प्रवचन थतु तेमा जैन जैनेतरभाईओ हरेक गाममाना तथा आजुबाजु गामोमाथी आवता प्रवचन तथा मघदर्शननो लाभ लेता अने प्रथमजवार आवु जोना आनद माथे धर्मनी वानगी लई जता आठे दिवस अष्टान्हिका महोत्सव होवाथी पूजा-भावना माटे मुबईथी सगीतकार मनुभाई आववाथी अनेरो रग जामतो हतो सघनु सचालन सघवीना लघुबधू मोतीलालभाई तथा अमलनेरवाळा त्रिखवदामभाई तथा सगा सबधीओए उत्तम रीते करेल निपाणी जैन युवक मडले सेवा करवानो सारो लाभ लीधो हतो छऽरिपाळता सघ यात्रिकोने सघवी तरफथी चरवलानी प्रभावना थई हती

निपाणी, कागल, कोल्हापूरमा शाहुपुरी, लक्ष्मीपुरी, गुजरी, त्रणेस्थले, रुकडी, इचलकरजी कुमोजगिरितीर्थस्थले सघवी तरफथी जैनमदिर केशरखाते ३२०० ।— तथा साधारण खाते ६२०० ।— आपी शुभखातामा सारो व्यय कर्यो हतो एकदर आठे दिवस छऽरिपाळता चतुर्विध सघनो भव्य कार्यक्रम थयो ए रीते वीतेला दिवसो मनमाथी केटलाय दिवसो न भूलाय



- नमवु एज मानव मन अने बुद्धिनु तात्विक फळ छे
- मननु बळ मत्रथी विकसे छे, मत्रमा सौथी श्रेष्ठ मत्र नमस्कार मत्र छे
- ममर्पण, प्रेम परोपकार अने सेवाभाव ए मानव मनना अने विकसित बुद्धिना सहज गुण छे
- बुद्धिनो विकास अने हृदयमा प्रकाश ए नमस्कारनु असाधारण फळ छे
- नमस्कारमा अहकार विरुद्ध नम्रता, प्रमाद विरुद्ध पुरुपार्थ अने हृदयनी कठोरता विरुद्ध कोमळता छे

# कुंभोजाद्रि

( छद ओवी )



—सौ नवलबाई दामोदर शाह
बोरगाव

डोगराच्या माथ्यावर, लक्षवेधी हे मदीर
जिनबिंब-प्रभा फाके, क्षेत्र पावन सुदर ॥ १ ॥

तिथे पुनवेच्या राती, गन्ध बहु दरवळत
निसर्गाची शोभा खुले, चांदण्याची बरसात ॥ २ ॥

दक्षिण महाराष्ट्र देशी, शत्रुजा परि महातीर्थ
मंदिर छान शोभले, मूर्ति शांत पार्श्वनाथ ॥ ३ ॥

हिरेजडित सुवर्ण, शिरी मुगुट तेजाळ
कर्णी कुडल सुषमा, गळा रुळे मुक्तामाळ ॥ ४ ॥

शिखरस्थ शातिप्रभु, चन्द्रापरी त्याची छाया
भुयारात अजितनाथ, सोन्यावाणी त्यांची काया ॥ ५ ॥

भान हरते दर्शनी, पार्श्वनाथ तीर्थंकर
प्रशातशा मूर्तिवरी, छाया धरी धरणेंद्र ॥ ६ ॥

श्रद्धा अचल हा पाया, पायथ्याची धर्मशाळा
सोने झाले या भूमिचे, पुण्यप्रभाव आगळा ॥ ७ ॥

साधु, साध्वी, त्यागी गण, येथ येऊनीया गेले
उपधान महातप, गिरी चरणाशी झाले ॥ ८ ॥

सिद्धक्षेत्र गिरिराज, येती जन दर्शनासी
सिद्ध स्मृति बिजलीची, लीन झाले चरणाशी ॥ ९ ॥

पूर्वी होऊनीया गेले, सिद्ध पुरुष बाहुबली
त्यानी कुंभोजाद्रि नाव, अमर केले पंचमकाली ॥ १० ॥

निरतर वाहणारी, बाहुबलीच्या डोगरी
भक्ति-तप-ज्ञान-गगा, जना समस्त उद्धरी ॥ ११ ॥

मदिराचे रचनाकार, शिरढोणी फत्तेचद
त्यांच्या स्तवनाचा छन्द, नवलबाईचा आनद ॥ १२ ॥

# भगवान् पार्श्वनाथ

( चरीत्र )



लेखक प्रो शांतिलाल खेमचद शाह, वार्शी

फार प्राचीन काळापासून भारतभू ही उच्च संस्काराची खाण म्हणून सुप्रसिद्ध आहे कारण जगाला तिने अनेक मोल्यवान् रत्ने दिली आहेत दीन आणि दु खी प्राण्यानाच नव्हे तर रकापासून रावापर्यंत सर्वांना सुखासमाधानाने रहाता येईल, ऐहिक व पारलौकिक कर्तव्ये पार पाडता येतील, असे आर्यसंस्कृतीचे दिव्य तत्त्वज्ञान जगाला देणाऱ्या महापुरुषाचे भरतवर्ष हे जन्मस्थान आहे

जीवमात्राच्या आर्तनादाने पार्श्वनाथाचे चित्त द्रवले, आणि म्हणून कौटुबिक स्वार्थ सोडून विश्वकुटुबाशी ते एकरुप झाले त्यानी अमोघ ज्ञानभाडार उघडून जगाला इष्ट वळण दिले स्वानुभवाने प्राप्त केलेल्या अमर ज्ञानाची ज्योत तेवत ठेवून जनतेला सत्य, अहिसा, प्रेम, त्याग, सेवा आणि समतेचे पाठ दिले अशा प्रकारे त्यानी जगाला विश्वबधुत्वाचे उच्च कौटुबिक जीवन शिकविले विश्वबधुत्वाचा हा उज्वल प्रवाह हिंसक वृत्तींच्या वणव्यातून, ईर्षा-द्वेषाच्या वाव-टळीतून आणि विषमतेच्या विस्तीर्ण दरीतून त्यानी अविरतपणे वाहविला 'जगा आणि जगू द्या' च्या सुवासाने सारे जग प्रमोदित केले

प्राणिमात्राचे कल्याण साधणारे तत्त्वज्ञान म्हणजेच धर्म जगाचे पालनपोषण आणि विकास करणारी ही दिव्य औषधि आहे कालमानाप्रमाणे इन्द्रियलोलुपतेमुळे जेव्हा ह्या तत्वात स्वार्थाची विकृति शिरते त्या वेळी उज्वल अशा धर्मतत्त्वाला खग्रास ग्रहण लागते इतकेच नव्हे तर मूलधर्म-तत्त्वाला बाजूला सारून त्याची विकृति हाच धर्म होऊन बसतो अशा वेळी जगाची शातता डळमळते

याप्रमाणे इ स पूर्वीच्या ८ व्या शतकात परिस्थिति निर्माण झाली होती श्रमविभागणी-च्या हितकारी तत्त्वावर आरूढ झालेला वर्णा-श्रमधर्म उच्चनीचतेच्या भावनेला बळी पडला गेला आणि त्यातूनच विषमतेची विषारी वेल फोफावली त्यामुळे चराचरसृष्टीत व्यापलेले परमेश्वराचे स्वरुप शूद्राच्या आणि निरपराध प्राण्याच्या बाबतीत मारक बनले स्त्रीला मोक्षा-साठी अनधिकारी ठरवून विलासाचे साधन बन-विण्यात आले सार्वजनिक आणि वैयक्तिक सुख-शातीसाठी गरीब बिचाऱ्या रेड्याला महिषासुर बनवून त्याचा बलि देण्याची अघोरी प्रवृत्ति

निर्माण केली गेली सर्वत्र रक्ताचे पाट वाहू लागले अशा प्रकारच्या हिंसाकांडामुळे देशांतील पशुधनाला ओहोटी लागली व यज्ञयागादि कर्मकांडाचें स्तोम अवास्तव माजले

अशा प्रकारे आत्मविकासाचें तेजस्वी तत्त्व क्रिडाकांडाच्या अतिरेकाच्या दडपणाखाली दडपले गेले म्हणून हिंसक वृत्ति आणि विषयलोलुपतापोषक क्रियाकांडाचें जाळे धर्माच्या नावावर विणले जाऊन त्यात जनसमूह माशाप्रमाणे आकर्षिला गेला बाह्य तप आणि चमत्काराचें अत्यंत प्रस्थ माजले

अशा परिस्थितीत इ स पूर्वी ८७७ त अेक महान् विभूति निर्माण झाली तिने आपल्या अलौकिक ज्ञानानें ह्या सर्व अधार्मिक आणि अहितकर अशा अज्ञानी क्रियाकांडावर झगझगीत प्रकाश पाडून जनतेला पुन्हा सत्य आणि अहिंसेच्या मार्गाकडे प्रवृत्त केले आज जवळ जवळ तीन हजार वर्षे होत आली परंतु त्याचे नाव आणि त्याची शिकवण जनतेच्या अंत करणात जशीच्या तशीच स्थिर आहे ती विभूति म्हणजेच भगवान् पार्श्वनाथ होय

इ स पूर्वी ८७७ चे ते वर्ष होते हिमालयाच्या मानसकन्येने पवित्र केलेल्या वाराणसी नगरीत सुप्रसिद्ध ईक्षाकुवंशीय अश्वसेन नावाचा राजा राज्य करीत होता तो न्यायी, पराक्रमी व प्रजेचे हित करण्यात तत्पर असे वामादेवी नामक त्याची सुशील व सुस्वरूप स्त्री होती 'शुद्ध बीजापोटी फळे रसाळ गोमटी' हा निसर्गनियमच आहे ह्या राणीला एके दिवशी अद्‌भूत स्वप्न पडले त्यात मंगलसूचक अशा चौदा वस्तु तिला दिसल्या * एक शुभ्र वर्णाचा सुंदर हत्ती आकाशातून खाली उतरून आपल्या मुखात प्रवेश करीत असल्याचे पाहून ती जागी झाली असली मंगलकारी स्वप्ने पाहून तिला आनंद झाला सुशिक्षित आणि सुसंस्कृत असल्याकारणानें त्यावरून त्रिभुवनी झेंडा फडकविणारे बालक आपल्या पोटी येईल असे तिला वाटू लागले नऊ मास पूर्ण झाल्यावर पौष शुद्ध १० ला विशाखा नक्षत्रात एका सुलक्षणी पुत्राला तिनें जन्म दिला " ते तेजस्वी व गोजिरवाणे बालस्वरूप पाहून मातापित्याचा हर्ष गगनात मावेना नामांकित ज्योतिर्विदाच्या संमतीने मुलाचे पार्श्वकुमार असे नाव ठेवले

प्राचीन काळी राजा प्रजेच्या सुख-दु खाशी समरस होत असल्याने राजाच्या सुखांत प्रजाही वाटेकरी होई त्यामुळे राज्यात चोहोंकडे आनंदीआनंद पसरला राजाने बंदीजन मुक्त केले याचकाना दानें वाटली प्रजेने गुढ्या-तोरणे उभारून नगर सुशोभित केले आणि मोठा उत्सव केला प्रतिदिनी राजकुमार चंद्राच्या कलेप्रमाणे वाढत होता जन्मत असलेले त्याचे गुण हळु हळु प्रगट होत चालले बालसुलभ सौजन्याने व प्रेमळतेने तो सर्वांचा आवडता झाला वामादेवीला तर त्याला कोठे ठेवू आणि कोठे नको असे झाले असल्यास त्यात नवल कसले ? युवराजाला अनुरूप अशा प्रकारचे शिक्षण देण्यात आले त्यात आपल्या शौर्याने आणि कुशाग्र बुद्धीने त्याने नाव कमावले सर्व प्रकारच्या शिक्षणात पारंगत

*चैत्र व॥ ४ ला मध्यरात्रीं प्राणत देवलोकातून वामादेवीच्या गर्भात एक भाग्यवान् जीवाचें आगमन झालें पूर्वजन्माच्या तीर्थंकर नामकर्माच्या विशुद्धतेमुळें मति, श्रुत आणि अवधि ह्या तीन ज्ञानांनीं तो परिपूर्ण होता.

"इन्द्रादि देवानीं त्याचा जन्मोत्सव अत्यंत थाटानें उजविल्याचें प्राचीन ग्रंथात अतिशय बहारीचें वर्णन आहे

होऊनही कुमार असंतुष्ट होता व तो पुष्कळ वेळा एकटाच कसल्यातरी चिंतनात तासन् तास निमग्न होई अशा वेळी त्याच्या चेहऱ्यावर अपूर्व तेज विलसत असे कारण ती चिंता मनास पीडा देणारी व्याधि नसून आत्म्यास उन्नत करणारी तन्मयता होती

कालचक्र वेगाने फिरत होते बाल्यावस्था सपून कुमाराने तारुण्यावस्थेत पदार्पण केले राजकार्याची धुरा आपल्या खांद्यावर घेण्यास तो समर्थ बनला कुमाराच्या पराक्रमाची यशोगाथा सर्वत्र पसरली परंतु पित्याच्या प्रेमळ नजरेला तो अजून बालकच दिसत होता

एकदा पार्श्वकुमार आपल्या महालात आत्मचिंतनात निमग्न असता अचानक रणभेरीचा नाद त्याच्या कानी पडला तंद्रीभंग होऊन कुमार एकदम चमकले आणि पित्याच्या निवासाकडे गेले पित्याच्या चरणी त्यांनी मस्तक ठेवताच शतायु होण्याचा आशीर्वाद देऊन राजा अश्वसेनाने वत्सलतेने त्याच्या पाठीवरुन हात फिरविला

'ही रणभेरी कसली, पिताजी ?' कुमारांनी प्रश्न केला

'कुशस्थलीकडे प्रयाण करतो आहोत आम्ही, कुमार' राजा अश्वसेन चिलखत चढवीत बोलला

'इतक्या घाईने ?' कुमारांनी जिज्ञासेने विचारले

'कर्तव्यपालनासाठी इतकी घाई जरूरीचीच आहे' राजा बोलला

'मग आपण स्वतःच कशाला जावयाला पाहिजे ? मी स्वारीवर जातो' कुमार उत्तरले

'नाही बाळ राजकन्येचे रक्षण करण्यासाठी मला स्वतःलाच गेले पाहिजे' अश्वसेनाने कारण दाखविले

'पण पिताजी, मी असताना आपणास रणसंग्रामाची चिंता का ? आपण मला आज्ञा द्या आपल्या आशिर्वादाने मी विजयी होऊनच येईन' कुमार निश्चयाने बोलले

बेटा, तू लहान आहेस कलिंग देशाच्या यवनराजाशी हा सामना आहे कुशस्थलीच्या राजकन्येचे हरण करण्यासाठी यवनराज चालून गेला आहे कुशस्थली नगराला वेढून त्याने त्याचा बाह्य जगाशी असलेला संबंध तोडून टाकला आहे मोठ्या शिकस्तिने त्यातून निसटून मंत्रीपुत्राने कुशस्थलीनरेश प्रसेनजित याचा निरोप आणला आहे राजकन्या आणि राजघराण्याची अब्रू वाचविण्यासाठी त्याने मदतीची याचना केली असता त्याच्या हाकेला ओ देऊन जुलमाने राजकन्येशी लग्न लावू पहाणाऱ्या कलिंगाधिपतीला शासन करण्यास आपण गेलेच पाहिजे' राजाने खुलासा केला.

'असे ! मग तर ह्या स्वारीवर जाण्यास मीच योग्य आहे पिताजी, आपण आज्ञा द्या प्रत्येक पिता आपल्या पुत्राला लहानच समजतो परंतु छोटासा केसरी प्रचंड हत्तीचे गंडस्थळ नाही का फोडीत ?' राजकुमार बाणेदारपणाने बोलले

पार्श्वकुमाराचा निश्चय पाहून राजा विचारात पडला

माझ्या शौर्याविषयी आपणास शंका तर वाटत नाही ना ?' कुमारांनी विचारले

'छे छे, बेटा त्यात कसली शंका ? तुझा पराक्रम सर्वत्र गाजत असता कोण बरे शंका घेईल ? जा आनंदाने जा आणि विजयी हो

माझा तुला आशीर्वाद आहे' अश्वसेनाने कुमारास परवानगी दिली

वडीलाची आज्ञा मिळताच पार्श्वकुमार मातेच्या महालात गेले वंदन करून त्यांनी युद्धासाठी तिची अनुज्ञा मागितली मातृसुलभ वात्सल्यामुळे क्षत्रियाणि असूनही वामादेवीच्या नेत्रात अश्रु चमकु लागले व पार्श्वकुमाराने वामादेवीस तिच्या कर्तव्याचे भान करून दिले नसते तर तिने आपल्या अश्रुनी त्याना न्हाऊच घातले असते

पार्श्वकुमाराचा तो वीरोचित उत्साह जाणून तिने त्याच्या कपाळीं कुंकुमतिलक लाविला आशीर्वाद घेऊन त्यानी वदनपूर्वक निरोप घेतला

मातापित्यानीं आज्ञा दिल्यामुळे कुमाराचा उत्साह फारच वाढला लावलावच्या मजला मारीत सैन्यासह ते कुशस्थलीसमीपच्या जगलात शिरले आणि मोठ्या शिताफीने त्यानी कलिंग सेनेला वेढले

अशा प्रकारे पार्श्वकुमारानी अचानक वेढल्याचें समजताच यवनराज चपापला वैयक्तिक विषयलालसेच्या पूर्तीसाठी असख्य वीराचे बलिदान व्हावे ह्याचे कुमाराना वैषम्य वाटले अन्याय व जुलमाना प्रतिकार झाला नाही तर प्राणिमात्राची सुखशांति धोक्यात येईल हे ते जाणून होते म्हणून शक्यतोवर रक्तदान न होता हे प्रकरण मिटविता आले तर पहावे या उद्देशाने त्यानी आपला प्रतिनिधि राजनीतीप्रमाणे कलिंगाधिपतीकडे पाठविला त्यास यवनराजाने मोठ्या सन्मानाने वागविले

छावणीतील एका प्रशस्त तंबूत उच्चासनी यवनराज बसला असून बाजूला त्याचे मंत्री होते एका प्रशस्त आसनावर वाराणसीचा प्रतिनिधि बसला होता 'राजन्, राजकुमारीचा विवाह हा तिच्या इच्छेचा प्रश्न आहे जोरजुलमाने तिच्याशी लग्न करण्याचा प्रयत्न आपल्यासारख्या वीरश्रेष्ठाला शोभत नाहीं आपल्या वैयक्तिक लालसेसाठी शेकडो स्त्रिया विधवा बनाव्यात, अनेक माता विव्हल व्हाव्यात आणि शेकडो वीराचे रक्त सांडले जावे हे योग्य नव्हे आपण हा अविचार सोडून आपले परपरागत संबंध कायम ठेवावेत अशी आमच्या महाराजानी इच्छा प्रकट केली आहे नाही तर एरव्ही स्त्रियाच्या अब्रुरक्षणासाठी आमच्या तरवारी नेहमी परजलेल्या असतात हे खूप समजावें' वाराणसीच्या प्रतिनिधीने स्पष्ट शब्दात बजावले

आवेशात आला की मनुष्य विवेकाला तिलांजली देतो परतु अभिनिवेश नाहीसा झाला म्हणजे अविचाराबद्दल तो पश्चाताप करतो राजकन्या प्रभावतीच्या सौंदर्याने यवनराज बेहोष झाल्यामुळे त्याला राजकन्येशिवाय काही सुचत नव्हते म्हणून त्याने प्रसेनजिताकडे तिची मागणी घातली पण प्रसेनजिताने त्यास नकार दिला त्यामुळे चिडून जाऊन यवनराजाने कुशस्थळीवरही स्वारी केली होती पार्श्वकुमाराच्या चरचरीत अजनाने त्याच्या डोळ्यावरील विषयाची धुंदी खाडकन् उतरली वाराणसीच्या आणि कुशस्थळीच्या सैन्याच्या मध्ये आपला चक्काचूर होण्यास वेळ लागणार नाहीं हे त्याने ओळखले कारण पार्श्वकुमाराचा पराक्रम तो जाणून होता त्याच्या मंत्र्यानीही सधीचा हात स्वीकारण्याबद्दल सल्ला दिली स्वतः कलिंगराज मंत्र्यासह कुमाराच्या छावणीत गेला आपणास दुष्कृत्यापासून परावृत्त केल्याबद्दल त्याने कुमाराचे आभार मानले आणि वेढा उठवून तो कलिंगला निघून गेला

कुशस्थळीचा वेढा उठताच नगराचे दरवाजे उघडले गेले आपल्या सर्व लवाजम्यासह प्रसेनजित राजा कुमाराचे स्वागत करण्यासाठी त्याच्या छावणीत आला आणि त्याने कुमाराना सैन्यासह मोठ्या सन्मानाने नगरात नेले मोठा दरबार भरविला तेव्हा वाराणसीकडून मिळालेल्या या अपूर्व मदतीविषयी प्रसेनजित राजाने कृतज्ञता व्यक्त केली आणि गहिवरून प्रेमभराने कुमारास गाढ आलिंगन दिले नगरात चोहोकडे कुमारानी दाखविलेल्या उदारतेचें, कर्तव्यनिष्ठा, शौर्य आणि समयज्ञता याचे गुणगान सुरू होते ते राजकन्या प्रभावतीच्या कानी पडताच तिच्या हृदयमंदिरातही कुमाराचा प्रवेश झाला कुमाराच्या पराक्रमाचे यशोगान ह्यापूर्वीच तिच्या कानावर अनेकदा पडल्यामुळे त्याच्याविषयी तिच्या मनात अनुराग उत्पन्न झाला होता त्यातच ह्या विजयप्रसंगाची भर पडल्यामुळे तिने पार्श्वकुमाराशींच विवाह करण्याचा निर्धार केला व तो सखीकडून मात्यापित्याला कळविला त्यामुळे त्या दरबारात राजकन्येचे पाणिग्रहण करण्याची राजाने कुमाराना विनंत केली कुमार दचकले

'राजन्, राजघराण्याची इभ्रत राखण्यासाठी वडिलाच्या आज्ञेने आपल्या हाकेला ओ देऊन मी आलो. ह्या प्रलोभनाने मी निघालो नव्हतो' कुमारानी जबाब दिला

'हे प्रलोभन नव्हे, कुमार राजकन्येने तसा निश्चय केला आहे आणि म्हणूनच तिला पदरात घेण्याची आपणास विनती केली आहे' राजा बोलला

राजाचा हा खुलासा ऐकून कुमार निरुत्तर झाले त्यानी राजाप्रसेनजिताचा निरोप घेतला आणि दरबार संपला विजयी पार्श्वकुमारानी वाराणसीत प्रवेश केला आपल्या आवडत्या कुमाराचे स्वागत करण्यासाठी प्रजा अत्यंत उत्सुक झालेली होती. सर्व नगर चित्रविचित्र ध्वजापताकानी सुशोभित करण्यांत आले होते सडासमार्जन करुन सुवासिनी आरत्या घेऊन उभ्या होत्या धीर व गभीरपणे कुमारानी नगरात प्रवेश केला कुमारिका आणि सुवासिनींनी कुंकुमतिलकाने कुमाराचे कपाळ सुशोभित केले वृद्ध स्त्रियानी बोटाचा कडका मोडून कुमाराची दृष्ट काढली कुमारानी माता-पित्याच्या चरणी मस्तक नमविले त्यानाही कृतकृत्य झाल्यासारखे वाटले रक्ताचा एकही थेंब न सांडता विजय प्राप्त करणाऱ्या त्या वीरपुत्राला जन्म दिलेल्याच्या मातेच्या आनंदाचे कोण वर्णन करू शकेल ?

थोड्याच दिवसानी कुशस्थळीहून प्रसेनजित राजा प्रभावतीसह वाराणसीत आला त्याने प्रभावतीचा निर्धार राजा अश्वसेन व वामादेवी याना कळविला वामादेवीला सून म्हणून प्रभावती फार आवडली कुमाराचा स्वाभाविक कल निवृत्तिमार्गाकडेच होता तरीसुद्धा कुमाराचे मन वळविण्याचा त्यानी बराच प्रयत्न केला मातापित्याच्या विशेष आग्रहाला मान देऊन कुमारानी लग्नास संमति दिली इ स पूर्वी ८५७ त राजघराण्यास साजेशा दरबारी थाटाने पार्श्वकुमाराचा राजकन्या प्रभावतीशी विवाह लावण्यात आला

एकदा राजवाड्याच्या मनोऱ्यावरून पार्श्वकुमार नगरशोभा पहात होते जगातील वैचित्र्य व प्राणिमात्राची सुखासाठी चाललेली धडपड ह्याचा त्याच्या मनात विचार चालला होता स्वार्थ, कपट, इंद्रियलोलुपता इत्यादिकाच्या जाळ्यात स्वतःला गुरफटून घेऊन प्राणी आत्म-

घात करून घेतो ह्या मोहपाशातून सुटण्याचा मार्ग प्राचीन मुमुक्षूनीं अवलवलेला आहे तो प्राप्त करण्यासाठीं ह्या सुखोपभोगापासून अलिप्त त्या मार्गाचे स्वानुभवाने सशोधन करून आपण जगाला मार्गदर्शक व्हावे, असे विचारतरग त्याच्या हृदयसागरात उसळत होते परम-शातीच्या या मार्गात विकृति शिरल्यामुळे भेसूर बनलेल्या धर्माचे चित्र डोळ्यापुढे येतांच त्याच्या अगावर शहारे आले

वाराणसीसमीपच्या जगलात एक तपस्वी आला होता त्याच्या तपःतेजाविषयी नगरात अनेक आख्यायिका पसरल्या होत्या त्यामुळे त्याच्या दर्शनास जाणाऱ्याची सख्या दिवसेदिवस सारखी वाढत होती आज राजरस्त्यावरील दर्शनोत्सुक लोकाचा कोलाहल जास्त वाढलेला असल्यामुळे पार्श्वकुमाराचे लक्ष तिकडे वेधले गेले चौकातून स्त्रीपुरुषाची सारखी रीघ लागली होती निरनिराळ्या वस्त्रप्रावरणानीं अलकृत झालेले, नैवेद्य व पूजासामग्री घेऊन हजारो स्त्री-पुरुषांचा हा जनसमूह कोठे निघाला ह्याचे पार्श्वकुमाराना कोडे पडले त्यानी आपल्या सेवकास तपासासाठी पाठविले

' गावाच्या बाहेर कमठ तपस्वी आले आहेत महाराज, त्याच्याच दर्शनाला हे सर्व लोक निघाले आहेत ' नोकराने येऊन सागितले

तपस्वी हा शब्द ऐकताच त्याच्या डोळ्या-पुढे एका तेजस्वी शात मूर्तीचे दृश्य उभे राहिले

तपस्वी म्हणजे जगाला सुखी करण्यात आपले सर्व जीवन वेचणारे महापुरुषच होत त्याची वाणी अमृतापेक्षाही मधुर असून त्याची छायाही चद्रापेक्षा शीतल भासणार असे त्याना वाटले

' त्याच्या पदरजाने खरोखर कृतकृत्य झाले हे वाराणसी शहर ' कुमार मनाशीच बोलले त्यानी घोडा मागविला आणि योगिराजाला पहाण्यासाठी त्यावर स्वार होऊन अनुचरासहित निघाले

भर दुपारची वेळ होती सूर्य आपल्या प्रखर किरणानी भूमितलाला तापवीत होता उत्साहा-तिरेकामुळे पार्श्वकुमाराना त्याचें काहीच वाटले नाही अथाग लोकसमूह तेथे उसळला होता एका झाडाखाली त्यानी घोडा थाबविला आपण केलेल्या सर्व कल्पना फोल ठरलेल्या पाहून ते आश्चर्याने चकितच झाले कल्पवृक्ष म्हणून आश्रयाला जावे तो काटेरी वृक्ष निघावा, तहा-नेने व्याकुळ झालेल्यास सरोवर दिसावे आणि ते मृगजळ ठरावे, तशीच राजकुमाराची स्थिति झाली

अगाला राख फासलेला एक कृश तपस्वी व्याघ्रचर्मावर बसलेला होता त्याच्या चोहो-बाजूला अग्नि धडधडत असून वरून पडणारी सूर्याची प्रखर किरणे तो तपस्वी सहन करीत होता त्याचे लालबुद डोळे मगळाप्रमाणे लुक-लुकत होते उत्तमोत्तम पक्वान्नानी व फळानी भरलेलीं ताटे नैवेद्य म्हणून भक्तजन त्याच्या चरणी समर्पण करीत होते तपस्व्याच्या चम-त्काराच्या अनेक दतकथा भक्तसमूहात पसरलेल्या होत्या तापस कमठाची अहकाराने ताठर बन-लेली नजर भक्तजनाकडे तुच्छतेने वळली होती लोकाची कमठावर पूर्ण श्रद्धा बसली होती कुमार तेथे आल्याबरोबर लोकानी त्याचा जय-जयकार केला त्याबरोबरच तपस्व्याच्या नावाचाही जयध्वनि लोकात दुमदुमला

तपस्व्याने आपली अहकारपूर्ण नजर राज-कुमारावर टाकली कुमारानी घोड्यावरूनच

भक्तिभावाने जमलेल्या लोकसमूहामधून नजर फिरविली धर्मकल्पनेची ही विटंबनाच होय असे त्यास वाटले ह्या कष्टचमत्काराला धर्म म्हणावयाला त्याचे मन तयार होईना तपस्व्याची नजर त्याच्याकडे वळली मिस्किलपणाने हसणारे त्याचे डोळे तपस्व्याने ओळखले राजकुमाराचा उद्धटपणा त्यास असह्य वाटला रोषाने त्याचा चेहरा उग्र बनला डोळ्यातून अग्नीच्या ठिणग्याच उडताहेत की काय असे वाटले क्रोधाग्नीमुळे त्याची मुद्रा अधिकच भेसूर दिसली

'राजा धर्मरहित असला तर प्रजाही अधर्मी बनते नाही ?' व्यंगोक्तीने तपस्वी राजकुमाराना ऐकू जाईल एवढ्या मोठ्याने बोलला लोकाच्या चेहऱ्यावरही राजकुमाराच्या उद्धटपणाबद्दल तीव्र नापसंतीचा भाव उमटला होता

'धर्म आणि अधर्म कशाला म्हणावा तोच तर मोठा प्रश्न आहे, तपस्वीजी' घोडा पुढे आणीत कुमार बोलले

'शरीरशोषण म्हणजेच तपश्चर्या तपश्चर्या करणे हाच धर्म आहे साठ साठ हजार वर्षे तपश्चर्या करणारे विश्वामित्रासारखे मुनि होऊन गेले आहेत' तपस्वी बोलला

'तपाचा उद्देश ?' कुमारानी प्रश्न केला

'स्वर्गसुख आणि मोक्षप्राप्ति' तपस्व्याने उत्तर केले

'केवळ शरीरशोषणाने मोक्षप्राप्ति अथवा स्वर्गसुख कसे प्राप्त होईल ? तापसराज, अन्नासाठी तडफडणारे शेकडो प्राणी काय स्वर्गाला जातील ? समुद्रात बुडून अथवा वणव्यात होरपळून निघणारे अगणित प्राणी काय ह्या उच्चस्थानी पोहोचतील ? केवळ कायक्लेश हा कधीच धर्म बनू शकत नाही कुमार शातपणे बोलले

'वा ! धर्म जाणण्याचा मोठा आव आणला आहेस की ! राजविलासात निमग्न राहणाऱ्यानीही तपश्चर्येच्या आणि धर्माच्या गोष्टी माझ्यासारख्याला शिकवाव्यात अ ?'

योग्याच्या या स्पष्टोक्तीने जनतेचा त्याच्याविषयीचा आदर द्विगुणित झाला त्यानी पार्श्वकुमाराकडे उपेक्षित नजरेने पाहिले

'स्वर्गलोकातील सुखाच्या प्राप्तीसाठी जर हे तप शरीरशोषण आहे तर इहलोकी ऐषारामात लोळणारे मोठमोठे लक्ष्मीपुत्र आणि राजेरजवाडे याना त्याची काहीच आवश्यकता नाही ना ?' पार्श्वकुमारानी मार्मिक सवाल टाकला

तपस्वी घोटाळला, निरुत्तर झाला आणि चिडला

'जगाच्या आदिकालापासून आमचे महान् ऋषिमहर्षि सागत आले आहेत ते का खोटे आहे? तुझ्या नास्तिकतेची अगदी सीमा झाली कुमार, असल्या नास्तिकतेमुळेच जग दुःखी झाले आहे धर्म सागण्याचा हा अव्यापारेषु व्यापार सोड' विझत चाललेल्या अग्नीवर फुकर टाकीत कमठ बोलला त्याबरोबर त्याच्या मनातील आग भडकत होती लोकानाही पार्श्वकुमाराचा सताप आला होता राजकुमार असल्यामुळेच थोडी मर्यादा ठेवली होती नाही तर जनसमूहाने त्याची दुर्दशाच केली असती

'प्राचीन महर्षि मूर्ख नव्हेत त्यानी सागितलेले क्रियाकाडही खोटे नाही परतु त्यातील मर्मच नेमके आम्ही गाळले आहे क्रियेच्या जोडीला ज्ञान हे अत्यावश्यक आहे क्रियारहित ज्ञान पागळे आहे तर ज्ञानरहित क्रिया आधळी आहे अज्ञानाने केलेल्या कायाक्लेशाने आम्ही मानवजीवन व्यर्थ गमावतो हे समजले पाहिजे

तप म्हणजे इच्छाविरोध ह्याचे बाह्य आणि अभ्यतर असे दोन प्रकार पडतील बाह्य तप म्हणजे इद्रियाचें दमन करणे आणि अभ्यतर तप म्हणजे मन सयमन व आत्मविकास करणे हे होय वाह्य तप आणि अभ्यतर तप ही परस्परावर अवलबून असतात लोण्याचा गोळा जराशी आच लागताच जसा विरघळतो तसे विषयाचे नुसते स्मरण झाल्याने इद्रिये भडकतात आणि मार्गभ्रष्ट होतात इद्रियाना आत्मविकासाला सहायक बनविणे हाच बाह्य तपाचा मुख्य उद्देश असतो त्यासाठी इद्रियदमन हा एकच उपाय आहे इद्रियाचे सयमन हे साध्य नसून आत्मजागृति करण्याचे ते साधन आहे इद्रियदमन होऊ शकले की मन स्थिरता प्राप्त करणे आवश्यक असते ती अभ्यतर तपाने होते मन स्थिरतेने दृष्टी अतर्मुख बनते, अतर्मुख दृष्टी आत्मसशोधन करते व हृदयाची मलिनता नाहीशी करते त्यामुळे द्वेष, दुराग्रह, मिथ्या दृष्टी, क्रोध, मान, माया, लोभ आणि मोह वगैरेचा क्षय होऊन सम्यग्दृष्टि प्राप्त होते आणि आत्मचितनात चित्त स्थिर होऊन एकाग्रता वाढते आत्मविकास जोपर्यत होत नाही तोपर्यत कितीही उग्र तपश्चर्या केली तरी ती सर्व व्यर्थ आहे

शरीर आणि आत्मा भिन्न आहेत. शरीर हे नश्वर आहे आणि आत्मा अमर आहे आत्मज्ञान बाजूला सारून केलेले शरीराचे पोषण आणि शोषण व्यर्थ आहे, कारण शरीर हे साधन आहे, साध्य नव्हे शरीरशुद्धीसाठी तपादि क्रिया आणि आत्मविकासासाठी ज्ञान अशी ही जोडी आहे ज्ञानयुक्त तपश्चर्येने शरीरशुद्धि होऊन मनोबल वाढते आणि मनोबल वाढले म्हणजे वृत्ति अतर्मुख होते व आत्म्याच्या विराट स्वरूपात विराम पावते यालाच आत्मानद म्हणतात त्याचे वर्णन पुढे वाणीने होऊ शकत नाही त्याच वेळी दिव्य ज्ञानाची प्राप्ति होते या केवलज्ञानप्राप्तीनतर ज्ञानौघ सारखा वाहू लागतो सर्वसामान्य लोक तिला प्रासादिक वाणी म्हणतात असा तपस्वी उग्र तपाचा खरा अधिकारी असतो, कारण आत्मसुखात तो लीन असल्याने देहाविषयी त्याला यत्किचितही आसक्ति नसते आणि कायक्लेशाचे त्यास महत्त्वही वाटत नाही त्याच्याशिवाय इतरानी केलेले असले अज्ञान तप म्हणजे धर्माचे विडबनच होय पार्श्वकुमारानी तपश्चर्येचा उद्देश स्पष्ट शब्दात सागितला

कुमाराच्या मुखावर अपूर्व तेज झळकत होते जनसमूह मुग्ध बनला होता त्याना आपल्या युवराजाविषयीं अभिमान वाटला पार्श्वकुमाराच्या जयजयकाराची गगनभेदी गर्जना अतराळात उसळली

तपस्व्याला पार्श्वकुमाराचे म्हणणे अमान्य नव्हते परतु त्याला मानापमानाचा मोह आवरेना आपल्या भक्तासमोर झालेला अपमान त्याला कोठून सहन होणार ? क्रोध अनावर झाल्यामुळे तो थरथर कापू लागला

'राज्यलोभाने अनेक निर्दोष माणसाचे खून पाडणाऱ्यानीं धर्माचा उपदेश करावा! वाहवा! खासा न्याय! कसावाने धर्म शिकवावा असेच नाही का होत हे?' दुसरे एक चदनाचें खोड हाती घेत तपस्वी बोलला लोकाना ते म्हणणे काहीसे पटल्यासारखे दिसले

'तृष्णा आणि इद्रियलोलुपता ही क्षत्रिय असो की सन्यासी दोघानाही सारखीच मारक आहे परतु अन्याय्य आक्रमणाला नाहीसे करण्यासाठी केलेले युद्ध धर्मच आहे असल्या युद्धात

अनेकांचा संहार होतो ही गोष्ट खरी आहे, परंतु हा संहार नसून जगाच्या कल्याणासाठी स्वेच्छेने केलेले बलिदान आहे जनताजनार्दनाची प्राणसहित सर्वस्व अर्पण करून केलेली ही पूजा आहे तपस्वीराज, निष्काम कर्मवीरांची ही अपूर्व तपश्चर्या आहे कुमारांनी समर्पक उत्तर दिले

'कोणत्या धर्माची आम्ही विटंबना करतो?' कुमाराचे म्हणणे योग्य अर्थाने घेण्याऐ जी रागाने बेभान झालेल्या कमठ तापसाने वितंडवादाला आरंभ केला एक चंदनाचे खोड त्याने अग्नीत खुपसले

ह्या चंदनाच्या खोडानेच त्याचा निर्णय दिला कुमारांनी आपल्या सेवकाकडून ते जळते खोड बाहेर काढविले आणि जपून त्याचे दोन भाग करविले तो त्यातून एक भुजंग निघाला जीव कासावीस झाल्यामुळे तो सारखा तडफडत होता शेवटची घटका मोजणाऱ्या त्या दुर्दैवी प्राण्याला कुमाराने नवकारमंत्र ऐकविला मंत्रश्रवणाच्या त्या पवित्र वातावरणात तो सर्प तन्मय झाला शांतपणाने त्याचें प्राणोत्क्रमण झाले कुमारांनी एक दीर्घ निश्वास सोडला

'धर्माच्या नावावर अशा कितीतरी प्राण्याचे निष्कारण बलिदान होत असेल ! अशा प्रमादाचरणाने का कधी मोक्ष मिळेल?' असे म्हणून दु खीत अंत करणाने कुमार परतले

अगोदरच युवराजाच्या अपूर्व ज्ञानाने लोकसमूह आकर्षित झालेला होता त्यातच सर्व प्रकरणाची भर पडली कुमाराविषयी त्यांच्या मनातील पूज्यभाव वृद्धिंगत झाला त्यामुळे ज्याची पूजा करण्यासाठी ते जमले होते त्याच तपस्व्याची विटंबना करून ते निघून गेले

तपस्वी क्रोधाने बेभान झाला होता अपमानाचे शल्य त्याच्या अंत करणात दडून बसले आणि सूडाची न विझणारी ज्वाला त्याच्या अंतरंगात भडकली काही काळानंतर सूडाच्या तीव्र भावनेत त्याचें प्राणोत्क्रमण झाले.

पार्श्वकुमारांना राज्याभिषेक करण्याची आपली इच्छा दरबारात राजा अश्वसेनाने मंत्र्यापुढे प्रगट केली सर्वांनी त्याला संमति दिली राजाने कुमारांना बोलावून आपली इच्छा कळविली परंतु कुमार मौनच राहिले राजाने पुन्हा विचारले तेव्हा त्यांनी उत्तर दिले, 'तात, हे राज्य घेऊन मी काय करू? भोग आणि विलासाच्या प्राप्तीने मनुष्याची तृप्ति कधीच झाली नाही आणि म्हणून ह्यापासून मी दूर राहू इच्छितो'

'पण बेटा, राज्यावर आरूढ होऊनही लोकांचे कल्याण करता येत नाही का?' अश्वसेनाने विचारले

'आपण म्हणता ते खरे आहे, परंतु ते राज्यापुरतेच, आणि ते फक्त ऐहिकच पण त्यामुळे माझे कार्यक्षेत्र संकुचित बनते आणि सत्यमार्गाच्या प्रसारात मोठी अडचण येते अपवाद जर सोडले तर सर्व जनता ह्या साधनांनी विषयलोलुपच बनते त्याचा त्याग न करता जनतेला सत्यधर्म कसा दाखविता येईल? राज्याची जबाबदारी कोणीही घेईल परंतु धर्मात शिरलेली विकृति घालविण्यासाठी कोण बरे पुढे येईल? माझा अंतर्नाद मला त्या साठीच बोलावितो आहे पिताजी, सारे विश्व माझे कुटुंब आहे आणि मला राजवैभवाचा वीट आला आहे कुमारांनी नम्रपणे पण निश्चित स्वरात सांगितले

राजाने कुमाराची मन स्थिति ओळखून ती चर्चा तेथेच थांबविली

एकदा वसतोत्सवानिमित्त पार्श्वकुमार राजोद्यानात गेले निसर्गदेवता सुदर वस्त्रे परिधान करून बसली होती कोकिळा कुऊ कुऊ आवाजाने वसताचे स्वागतगीत गात होत्या मद मद वायुलहरी त्याला सुस्वराची साथ देत होत्या लता आनदाने डोलत होत्या फुले हसत होती परतु पार्श्वकुमाराना त्यात काहींच आनद वाटला नाहीं मनुष्याच्या विचारलहरी नेहमीं हृदयाच्या तारेवर छेडल्या जातात हेच खरे

'इतकी हसरी वनश्री, पण ही सुद्धा कोमेजणार ना ? काळाच्या कराल दाढेतून कोण वरे सुटणार आहे ? जीवनाचे सार्थक करण्यासाठी वैराग्यरगात मग्न होत चाललेल्या पार्श्वकुमारानी अशा प्रकारच्या विचारात मग्न असतानाच उद्यानातील महालात प्रवेश केला त्याचे चित्त जास्त अस्वस्थ झाले म्हणून ते एका आसनावर वसले समोरच्या भितीकडे त्याचे लक्ष गेले भगवान् श्रीनेमिनाथ आणि महासती राजिमतीचे ते चित्र होते त्या चित्राकडे एकाग्रतेने त्यानी पाहिले आणि त्यात ते अगदी तन्मय झाले

भगवान् नेमिनाथ-राजिमती याचें जीवन त्याच्या डोळ्यापुढे चलचित्रपटाप्रमाणे उभे राहिले

भगवान् श्रीनेमिनाथ हे यादववशातील समुद्रविजय महाराजाचे पुत्र आणि श्रीकृष्णाचे चुलत भाऊ होते शौरीपुरीला त्यांचें राज्य होते कसवधानतर जरासघाच्या त्रासाने यादवानी द्वारका नगरी वसविली नेमिनाथ हे लहानपणापासूस अत्यत बलवान् व पराक्रमी होते मथुरेच्या उग्रसेन राजाच्या मुलीशीं त्याचे लग्न ठरले मोठ्या लवाजम्यासह वऱ्हाडही निघाले सर्व व्यवस्था श्रीकृष्ण जातीने पहात होते वऱ्हाड मथुरेच्या सीमेवर पोहोचले नेमिनाथाचा रथ गावाजवळ आला इतक्यात पशूचे आक्रदन त्यानी पाहिले त्याच्या आक्रदनाने भगवान् श्रीनेमीनाथाचे हृदय द्रवले

'कशासाठी हे पशु पक्षी जमविले आहेत तेथे?' श्रीनेमीनाथानीं सारथ्याला विचारले

'आपल्या लग्नाच्या मेजवानीसाठी' हसत हसत सारथी बोलला नेमिनाथाच्या हृदयावर तीव्र आघात झाला 'मला असले लग्न कर्तव्य नाही' असे म्हणून त्या मुक प्राण्याची त्यानी सुटका करविली आणि रथ तसाच मागे परतविला लोकानी समजविण्याचा पुष्कळ प्रयत्न केला परतु व्यर्थ ससाराच्या बाह्य सौंदर्यावरून त्याचे मन उडाले राजिमतीला हे कळले रथ मागे फिरलेला पहाताच ती मूर्छित पडली शुद्धीवर आल्यानतर तिने एकच आकान्त केला मतापितानी समजविण्यासाठी पुष्कळ प्रयत्न केला त्यावर राजिमती करारीपणाने बोलली, 'पिताजी, ज्या दिवशी नेमिकुमाराशी माझा वाङ्निश्चय झाला त्याच दिवशी माझे खरे लग्नही झाले हा समारभ केवळ लोकरीतीसाठी आहे त्याच्याच पावलावर पाऊल टाकण्याचा पत्नीधर्म मी पार पाडणार आहे' असे म्हणून सती राजिमतीनेही घर सोडले आणि रैवताचल पर्वतावर उग्र तपश्चर्या करणाऱ्या नेमिनाथाकडे ती गेली केवळ ज्ञानाच्या द्वारा जगाच्या सत्य स्वरुपाचा नेमिनाथाना साक्षात्कार झाला होता त्याच्या हस्ते राजिमतीने भागवती दीक्षा ग्रहण केली जगात ज्ञानाचा प्रकाश आपल्या प्रासादिक वाणीने पसरवीत भ नेमिनाथ गिरनार पर्वतावर गेले आणि शुक्लध्यानात तन्मय होऊन त्यानी निर्वाणपद प्राप्त केले

ह्या जीवनचरित्रात तन्मय झालेल्या पार्श्व-नाथाना भगवान् नेमिनाथाचा आदर्श फारच आवडला मोक्षाच्या प्राप्तीसाठी त्यानीही दीक्षा घेण्याचा निश्चय केला

मातापितराना त्यानी आपला निश्चय कळविला त्यानी कुमाराना समजविण्याचा आटोकाट प्रयत्न केला परतु शेवटी कुमारानीच सर्व कौटुबिक जनाची समजूत घातली सतत एक वर्षपर्यंत तीर्थकरपदाला शोभेल असे अगणित दान देऊन त्यानी आपल्या भावी जीवनाची मुहूर्तमेढ रोविली

भर तारुण्यात पार्श्वकुमार राजसमृद्धि सोडून स्वपरकल्याणासाठी घराबाहेर पडले त्यानी स्वहस्तेच केशलुचन केले ते दृश्य पाहून त्याच्या-वरील प्रेमामुळे त्याची मातापिता, पत्नी, आप्तेष्ट आणि प्रजाजनाच्या डोळयातून अश्रूच्या धारा वाहू लागल्या इ स पूर्वी ८४७ त सर्व माया-पाश तोडून त्यानी सवेगीदीक्षा घेतली त्याच वेळी त्याना मन पर्यवज्ञान उत्पन्न झाले त्याच्या-बरोबर इतर ३०० राजानीही दीक्षा घेतली हा दीक्षासमारभ फारच थाटाने साजरा झाला

श्रीपार्श्वनाथ हे मति, श्रुत, अवधि आणि मन पर्यव ह्या चार प्रकारच्या ज्ञानानी युक्त असूनही जगाला उपदेश देण्याच्या खटपटीत पडले नाहीत त्यानी एका साधकाची भूमिका घेतली जोपर्यंत केवलज्ञान प्राप्त केले नाही तोपर्यत जगाला त्यानीं उपदेश केला नाही पूर्ण आत्मविकासानतर स्वभावत स्फूर्तीने वाहणारा ज्ञानौघ अज्ञानमय विकृतीला वाहून नेण्यास समर्थ असतो उपदेशकाच्या आत्मसामर्थ्यावरच जगाच्या हिताहिताचे प्रमाण अवलबून असते जगाचे हित साधण्याची भावना दोन प्रकारची असू शकते एकीत जगाच्या कल्याणाची खरी तळमळ असते आणि त्यासाठी साधक प्रथम अत शुद्धि करून पूर्ण आत्मविकास साधतो आणि केवलज्ञानप्राप्तीनतर जगाच्या कल्याणाकडे वळतो अशा साधकानाच अवतारी पुरुष म्हणतात कारण त्याच्या निर्दोष वाणीतून सहज श्रवणाऱ्या उपदेशाने जगात सुख, शाति आणि पवित्रता नादते दुसऱ्या प्रकारच्या लोकात प्रसिद्धीची आणि मोठेपणाचीच हाव असल्यामुळे फक्त विद्वत्ता प्राप्त करून तिच्या योगाने जनतेवर आपले वर्चस्व ठेवण्यासाठी ते सारखे झटत असतात त्यांच्या कोरड्या पाडित्याला केव्हा केव्हां जग भुलते. परतु त्याने जगाचे हित मात्र कधीच होत नाही

श्रीपार्श्वनाथ हे अन्तर्बाह्य तपाच्या द्वारा आत्मज्योत प्रज्वलित करण्याच्या प्रयत्नाला लागले इद्रियदमनाचा कडक मार्ग त्यानीं स्वीकारला शरिरावरील ममत्व हटत चालले. शहर, अरण्य, स्मशाने, ओसाड गावे अशा विविध ठिकाणी ते ज्ञान आणि ध्यान ह्यात मग्न होऊन विहार करीत होते. कोणी लोक त्याना आदराने वागवीत तर कोणी पाखडी समजून नानाप्रकारे छळ करीत या सर्व अनुकूल आणि प्रतिकूल प्रसगात समभाव ठेवून श्रीपार्श्वनाथ आत्म-विकास साधीत होते

एकदा ते असेच एका गावाबाहेरील अरण्यात झाडाखाली उभे होते आत्मानदात ते अगदी एकरूप झाले होते इतक्यात एकाएकी काळ्या मेघानी आकाश भरुन आले मदोन्मत्त हत्तीप्रमाणे ढगानी तुफान गर्दी माजविली होती आकाश कोसळून पडते की काय अशा मेघगर्जना सुरू झाल्या कडाड् कडाड् विजा चमकू लागल्या प्रलयकालच आला की काय असे वाटू लागले

मेघातून जलबिंदू इतक्या तीव्र वेगाने खाली घसरत की जणू गोफणींतून सुटलेले दगडच धनुष्यापासून सुटणाऱ्या शरापेक्षाही अधिक वेगाने ते खाली येत होते अशा प्रकारे सारखा मुसळधार पाऊस सुरु झाला प्रकृति जणू काय आपल्या सर्व बळासह महात्म्याची सत्त्वपरीक्षाच करीत होती हिंस्र श्वापदेही त्रस्त होऊन निवाऱ्यासाठी इतस्तत धावत होती परतु झाडाखाली ध्यानस्त असलेले श्रीपार्श्वनाथ मात्र जसेच्या तसे शान्त होते, मेरूपर्वताप्रमाणे अचल होते पाणी झपाट्याने वाढू लागले अल्पावकाशात तेथे एक मोठ सरोवरच दिसू लागले पाणी त्याच्या गुडघ्यावर चढत चढत नासिकेपर्यंत पोहोचले

हा निसर्गाचा कोप नव्हता वासनेच्या ज्वालेत भस्म झालेल्या कमठ तपस्व्याचा तो उपसर्ग होता रोमरोमात सूडाची आग धुमसत असलेला तो मृत्यूनतर मेघमाळी नावाचा दानव बनला होता ध्यानस्थ असलेल्या श्रीपार्श्वनाथाना पाहून त्याचे मागील वैर ताजे झाले अपमानाबद्दल सूड उगविण्यासाठी त्याने हा प्रलय निर्माण केला होता

जगात सन्मार्गात काटे पसरविणारे दुर्जन पुष्कळ असले तरी त्याच्या त्या काट्यावर स्वत चा देह टाकून लोकाना सुमार्ग मोकळा करून देणारे सज्जनही काहीं असतातच ह्या सज्जनाच्या अशा त्यागावरच जगाचें सुख आणि समाधान अवलबून असते

कमठ तपस्व्याच्या अग्नीतून निघालेला अर्धदग्ध सर्प शुभ ध्यानाने धरणेन्द्र नावाचा नागदेव बनला होता त्याने प्रचड नागाचे रूपाने येऊन आपली फणा प्रभूच्या शिरावर धरली प्रचड वृष्टीचे ताडवनृत्य सपले अशा भयकर परिस्थितीतही श्रीपार्श्वनाथाची ती समता आणि निश्चलता पाहून लज्जित झालेला मेघमाळी त्याच्या चरणी लीन झाला

ध्यान पूर्ण झाल्यावर प्रभूनी डोळे उघडले एका बाजूला सहायक धरणेन्द्र उभा असून दुसऱ्या बाजूला खलभुजग मेघमाळी होता त्यानी सारख्याच अमृतमय दृष्टीने मेघमाळी आणि धरणेन्द्र याच्याकडे पाहिले उपकारक म्हणून धरणेन्द्राविषयी त्याना प्रेमभाव वाटला नाही किवा पीडा देणारा म्हणून मेघमाळीविषयी त्याच्या अत करणात तिरस्कारही उत्पन्न झाला नाही अशा प्रकारे इद्रिय आणि मन ह्याना सपूर्ण ताब्यात आणल्यामुळे त्याचा अतर्गत विकास होत गेला पूर्ण ज्ञानमय असलेल्या आत्म्यावरील ज्ञानावरणीय, दर्शनावरणीय, मोहनीय आणि अतराय या चार कर्माचा पडदा बाजूला सरला मेघाच्या आवरणातून निसटलेला सूर्य जसा प्रखर तेजाने तळपतो त्याप्रमाणे हा पडदा बाजूला सरताच त्याचा आत्मा अनतज्ञान आणि अनतदर्शनाने तळपू लागला त्या अलौकिक उज्ज्वल स्वरूपात त्याच्या भावना विराम पावल्या आणि अखिल विश्व साक्षात् दिसू लागले यालाच केवलज्ञानाची प्राप्ति अथवा आत्मसाक्षात्कार म्हणतात

दीक्षेनतर अवघ्या चौऱ्याशी दिवसानी चैत्र कृ ४ च्या दिवशी श्रीपार्श्वनाथ सर्वज्ञ बनले भगवान् महावीराच्या पूर्वी 'अहिसा परमो धर्म' च्या मंत्राने साऱ्या भारतवर्षाला पवित्र करणारे भगवान् पार्श्वनाथच होत

ज्ञानदृष्टि प्राप्त झाल्यावर लागलीच सर्वज्ञ अशा पार्श्वनाथप्रभूनी आत्मानुभव जनतेपुढे ठेवण्यास सुरुवात केली आता त्याची साधकदशा

सपर्ली होती आपल्या सपूर्ण ज्ञानाने जगासाठी, हितकारी असा मार्ग त्यानी खुला केला दीन, दु खी अशा जीवमात्राला सान्त्वन आणि समाधान देणाऱ्या परमकल्याणकारी मार्गाचा उपदेश देत ते काशी, कौशल, पचाल, मगध, मालव, अवती, महाराष्ट्र, अग, वग कलिंगादि सर्व देशात ते हिंडले अशा प्रकारे अखिल भरतखडात सत्यमार्गाचा त्यानी प्रसार केला

विहार करीत ही महान् विभूति वाराणसी नगराबाहेरील उद्यानात आली अशोक वृक्षाच्या खाली एका दिव्य आसनावर ती तेजस्वी मूर्ति विराजमान झाली होती चेहे-यावर सूर्यासारखे तेज चमकत होते चद्राची शीतलता चोहोकडे फैलावत होती मुखाभोवती तेजाचे एक वलय पसरलेले दिसत होते स्त्रीपुरुषच नव्हे तर प्राणिमात्र प्रभूच्या मुखातून बाहेर पडणारी वाणीरुप मुक्ताफळे वेचण्यात आतुर झाले होते त्या पवित्र वातावरणात ईर्षद्वेषाचे लेशमात्रही अस्तित्व दिसत नव्हते

'हे भव्य जीवानो! जगाचे सत्यस्वरूप जाणण्यासाठी अत दृष्टि प्राप्त करा जगाचे वैचित्र्य किंवा जडाचें मायाजाल ह्यात फसू नका, मुग्ध बनू नका उत्पाद, व्यय आणि ध्रुव ह्या तीघावरच जगाची उभारणी आहे आत्मा स्वत ज्ञानी आहे, मुक्त आहे, परतु कर्मजन्य आवरणाने त्याची अनन्तशक्ति दडपली गेली आहे, ह्या आवरणामुळेच देव, मनुष्य, तिर्यच, नारकी इत्यादी भेद पडतात, स्त्रीपुरूष अथवा उच्चनीचतेच्या भावना भासतात म्हणून आत्म्याचे सत्य स्वरुप ओळखा अज्ञान हेच सर्व दु खाचे मूळ आहे ज्ञानाचा प्रकाश मिळवा प्राणिमात्राच्या ठिकाणी आत्मा ओळखा. मी आणि तू हा भेदभाव आत्मार्थी ओळखत नाही. धर्माशीं आत्मविकासाचा सबध आहे. सर्व प्राणिमात्र धर्माचे अधिकारी आहेत पौद्गलिक सुख कृमिकीटकही प्राप्त करतात, तशा सुखासाठी हा मानव देह नाही हे लक्षात घ्या

इद्रियजन्य सुखाने कधीहि तृप्ति होत नाही त्याचा त्याग हेच तृप्तीचें साधन जाणा हे भव्य जीवांनो, हें समजा, विचार करा आणि आचरण करा '

अशा प्रकारे भगवान् पार्श्वनाथाची विश्वहितकर वाणी जीवमात्राच्या आत्म्याला शातवीत होती, विषयमग्न असलेल्या मानवाना ज्ञानाचा प्रकाश पोहचवीत होती समता, विश्वबधुत्व 'जगा आणि जगू द्या' चा अमोल सदेश पसरवीत होती

त्याच्या उपदेशाचा स्वीकार करुन त्याप्रमाणे आचरण करणारे अनेक लोक निघाले अन्य तीर्थंकराप्रमाणे साधु, साध्वी, श्रावक, आणि श्राविका हे चार विभाग त्यानी पाडले, त्याच्या आत्मविकासाच्या चढत्या श्रेणी ठरविल्या या चार विभागाना चतुर्विध सघ म्हणतात त्याच्या आचरणानेच धर्माचे अस्तित्व रहाणार असल्याने त्यास तीर्थ (तारणारे) ही सज्ञा भगवतानी दिली अशा प्रकारे तीर्थाची स्थापना केली म्हणून त्याना तीर्थंकर म्हणतात रागद्वेषादि षड्रिपूना जिंकणारे म्हणून लोके त्याना जिन म्हणू लागले त्यामुळे त्याच्या अनुयायाना जैन म्हणतात ह्या कालचक्रात एकदर चोवीस तीर्थंकर झाले असून त्यात भगवान् पार्श्वनाथ हे तेविसावे होत ज्याच्या आदर्शावरून त्यानी आपला जीवनमार्ग निश्चित केला ते भगवान् नेमिनाथ बाविसावे तीर्थंकर होत

स्वच्छदी आचरण म्हणजे अध पाताला आमत्रण होय हे जाणून त्यानी चतुर्विध सघाचे

उभारण्याचे काम चालू आहे त्या ठिकाणी वाडी, धर्मशाळा, हॉस्टेल व भोजनशाळा याची सोय होणार आहे

कँटोन्मेंट भागातील मदिराशेजारीच एक धर्मशाळा बाधलेली आहे जयनगरमध्ये विद्यार्थी बोर्डिंगसाठी जागा सरकारतर्फे मिळालेली आहे

पू पा. आ श्रीमद् गभीरसूरीश्वरजी म आणि पू पा आ लक्ष्मणसूरीश्वरजी म याच्या प्रेरणेने शासनसेवेची कार्ये अखडितपणे चालू आहेत साधु साध्वी महाराजाच्या चातुर्मासाचे योग बरेच वेळा येथे येऊ लागले आहेत सर्व समाजामध्ये धर्मभावना प्रभावी आहे

बगलोर हे आधुनिक कारखानदारीचे मोठे केंद्र असून विधान सभा, शीशमहाल आदि ठिकाणे हौशी प्रवाशाना आकर्षून घेतात

## ७. जिल्हा रत्नागिरी, (महाराष्ट्र)

**रत्नागिरी** कोकण भागातील हे जिल्ह्याचे ठिकाण असून लोकसख्या चाळीस हजार आहे येथे जैन श्वे श्रावक सख्या अदाजे ७५ आहे एक गृहमदिर सन १९४९ मध्ये स्थापन झाले असून तेथे मुनिसुव्रत स्वामि याची प्रतिमा आहे श्रावकाचा मुख्यत्वे कापड व सराफी व्यापार आहे

## ८. जिल्हा विजापूर, (म्हैसूर राज्य)

**विजापूर** आदिलशाहीच्या राजधानीचे आणि सध्या जिल्ह्याचे ठिकाण असलेल्या या गावाची लोकसख्या एक लाख असून त्यामध्ये मूर्तीपूजक श्वे श्रावक अकरागे आहेत गुजरात, राजस्थान, कच्छ काठेवाड या भागातून व्यापाराच्या निमित्ताने आलेले लोक येथे स्थायिक झालेले आहेत येथील बाजार पेठेतील श्री पार्श्वनाथ रस्त्यावर श्री जगवल्लभ पार्श्वनाथ प्रभूचे दुमजली आणि तीन शिखराचे एक भव्य जिनालय आहे सवत १९८४ मध्ये स्थापन झालेल्या या मदिराच्या तळमजल्यावर श्री जगवल्लभ पार्श्वनाथ आणि दुमजल्यावर श्री आदीश्वर भगवानाची प्रतिमा आहे सघवी गुलाबचद गोविदजी याचे गृहमदिर असून तेथे श्री पार्श्वनाथ प्रभूची धातूची प्रतिमा आहे येथे पाठशाळा स २०२० पासून सुरू असून दहा मुले व पधरा मुली तेथे धार्मिक अध्ययन करतात, येथे दोन उपाश्रय आहेत स २०११ पासून वर्धमान तप आयबिल खाते चालू आहे

येथील श्रावकवर्ग धर्मपरायण असल्याने वारवार साधुमहाराजाचे चातुर्मास करवणे, उपधान आदि तप करवणे, धार्मिक उत्सव करणे चालू असते

येथील शेठ रामजीभाई देवसी व सौ नेनबाई रामजीभाई याची सुकन्या कु. हेमलता यानी स २०२५ मध्ये सवेगी दिक्षा घेऊन त्या सूर्यमालाश्रीची शिष्या स्थितप्रज्ञाश्री झाल्या तसेच प पू प रजनवि गणिवर्य याचे शिष्य राजेशविजयजी येथलेच व त्याचा दीक्षाविधीहि विजापुरच्या प्रागणात झाला

येथील गोलघुमट, जामा मशीद, इत्यादि ऐतिहासिक वास्तू व काही ऐतिहासिक अवशेष पाहाण्यासाठी प्रवाशाची नेहमी गर्दी असते

## ९. जिल्हा सातारा (महाराष्ट्र)

### १. ओगलेवाडी (ता कऱ्हाड)

एकूण २ हजार वस्तीच्या या गावात जैन श्वे श्रावक ८१ आहेत प्रामुख्याने ते कच्छ देशचे असून किराणा भुसार माल हा त्याना

प्रमुख व्यवसाय आहे जैन सघाचे श्री वासुपूज्य स्वामीचे एक गृहमदिर सन १९३५ ला येथे स्थापन झाले शाह शिवजी वेलजी याच्याकडील गृहमदिरात श्री पार्श्वनाथ भगवनाची प्रतिमा आहे येथे विविध प्रकारचे काच सामान तयार करण्याचा कारखाना आहे.

## २. कराड (ता कराड)

पूणे बगलोर हमरस्त्यावरील या गावाची लोकसख्या ५० हजार असून श्वे मू श्रावकाची सख्या १५०० आहे कापड व सराफी आणि किराणा व्यापार हा श्रावकाचा प्रमुखत्वाने व्यापार आहे सन १९०० च्या आसपास येथे

श्री संभवनाथ प्रभू



प्रासाद, कराड

आपल्या समाजाची १०।११ घरे होती व श्री चिंतामणि पार्श्वनाथ विराजित एक गृह-मदिर होते. श्री सभवनाथ प्रभू मूळ नायक असलेल्या शिखरबदी भव्य मदिराचा प्रतिष्ठा महोत्सव वैशाख शु॥ ६ स १९६२ सोमवार ता ३०।४।१९०६ रोजीं झाला. हे मंदिर कराड येथील हाथीभाई मलुकचद यानी बांधून दिले असा मदिराच्या प्रवेशद्वारावर शिलालेख आहे त्यांचे चिरजीव हिराचद हाथीभाई यानी प्रतिष्ठा करविली व ध्वजा चढवण्याचा चढावा आपणच घेतला. हल्ली त्याचे चिरजीव प्रभुलालभाई ही ध्वजा प्रतिवर्षी चढवीत असतात त्यानतर या मदिराचें मागिल भागांत माघ शु॥ १० स. १९८९ रविवार रोजी श्री शांतिनाथ भगवतांच्या चौमुखजी देरासरची प्रतिष्ठा येथील शाह खेमचद नारायणजी यांच्या मार्फत होऊन त्या मदिरावरील ध्वजेचा चढावाहि त्यानीच घेतला आहे त्यांचे चिरजीव चुनिलालजी हल्ली ती ध्वजा चढवतात

गुरुवार पेठेत शाह हिराचद राजाराम याचे श्री पार्श्वनाथ भगवान गृहमदिर आहे.

कराड गावाला शासन प्रभावक महान आचार्यदेव साधु आणि साध्वीजी महाराजाचा अनेक वेळा लाभ झाला कराड येथील सघाने त्याचे स्वागत करून, चातुर्मास करवून, विध-विध तपाराधना करवल्या व त्यानिमित्ताने आपण धर्मरत राहून, धर्मोत्सवांत विपुल धनव्यय करून, दूरदूरच्या साधर्मी बधुभगिनींची भक्ति केली आहे

येथे एक उपाश्रय आणि सर्व सोयींनी युक्त अशी दुमजली धर्मशाळा आहे. सवत २००२ पासून येथे पाठशाळा सुरू करण्यात आली असून १५० मुलामुलीना धार्मिक पाठ दिले जातात.

अलिकडेच जैन मतानुसार धार्मिक विधि विधान करणारे एक मडळ येथे स्थापन झाले असून त्याचा या भागांतील धर्मोत्सवाला फार उपयोग होत आहे.

कराड संघाची शासनभक्ति, सामाजिक कार्याविषयी अनुराग, साधुसाध्वीजीच्या ठायींचा भक्तिभाव, सार्धर्मि भक्तीची हौस प्रशसनीय आहे

### ३. कोरेगांव ( ता कोरेगाव)

दहा हजार लोकवस्तीच्या या गावात जैन श्वे. श्रावक घरे ६० असून सख्या अदाजे ५०० आहे किराणा, अडत, कारखानदारी असा त्यांचा व्यवसाय आहे गुजरात व कच्छ देशातील श्रावकगण आहे

एका विशाल जागेवर स २०२४ मध्ये श्री मुनिसुव्रत स्वामीचे शिखरबदी मदिर बाधून झाले आहे ते रमणीय आहे येथे दोन उपाश्रय आहेत

### ४. खटाव (ता खटाव)

येथील लोकसख्या ६०० असून जैन श्वे श्रावक घरे ८ व सख्या ६० आहे. येथील जिनमदिर १०० वर्षापूर्वीचे जुने असून तेथे स १६६४ मधील धातुची चोवीसी आहे.

### ५. चितळी (ता खटाव)

या गावची लोकसख्या ५,५०० असून जैन श्वे श्रावकांची संख्या २५ आहे येथे श्री पार्श्व-नाथ मदिर सन १९४० मध्ये स्थापन झाले आहे

६ मसूर (ता कराड)

एकूण पाच हजार लोकवस्तीमध्ये श्रावकाची सख्या अडीचशे आहे. गुजराती कच्छी व राजस्थानी श्रावक समाज असून प्रामुख्याने व्यापार व्यवसायी आहे व्यापारी पेठेत श्री सुमतीनाथ भगवान मूळ नायक असलेले मदिर स १९७४ मध्ये स्थापन झालेले आहे. एक उपाश्रय आहे स २०२५ च्या पर्युषण पर्वापासून येथे पाठशाळा सुरू झाली असून ५० मुलेमुली धार्मिक अध्ययन करतात समाजात धर्मवृत्ती जागृत आहे

७ म्हासुर्णे (तालुका खटाव)

सुमारे चार हजार वस्तीच्या या गावात श्रावकाची सख्या १५ आहे येथे एक गृहमदिर असून तेथे श्री पार्श्वनाथ भगवानाची प्रतिमा आहे

८ रहिमतपूर (ता कोरेगाव)

येथील लोकसख्या अदाजे १६ हजार आहे येथे गुजराती आणि ओसवाल समाज मिळून १५० श्रावकाची सख्या आहे किराणा, स्टेशनरी, सुमार, सराफी अशा व्यवसायात श्रावक समाज आहे येथे मूळनायक श्री महावीरप्रभु असलेले मदिराची प्रतिष्ठा जेष्ठ शु॥ २ सवत १९४३ ला झाली आहे गाभाऱ्यात मूळ नायकच्या बाजूस श्री आदीश्वर आणि नेमिनाथ प्रभु विराजमान असून बाहेरील रगमडपात श्री कुथुनाथ आणि सुमतिनाथ भगवान विराजमान आहेत एक उपाश्रय आहे

९. राजापूर (तालुका–खटाव)

दोन हजार लोकसख्या श्रावक सख्या नऊ एक गृहमदिर असून श्री महावीर स्वामि विराजमान आहेत

## १०. जिल्हा सांगली ( महाराष्ट्र )

१. आष्टा सवालाखी (ता वाळवा)

सागली इसलामपूर मार्गावरील या गावात लोकसख्या जवळजवळ १६ हजार असून गुजराती व राजस्थानी श्रावक सख्या ३० आहे. व्यापार व शेती हा त्याचा व्यवसाय आहे.

२. आरग (ता मिरज)

मिरजेच्या ईशान्येस बारा मैलावर असलेल्या या गावात बारा हजार लोकवस्ती आहे जैन श्रावकाची आठ घरे असून सख्या ७५ आहे विशेषकरून शेती व अल्पाशाने व्यापार हा व्यवसाय आहे येथे श्री वासुपुज्य स्वामीचे मदिर स २०२५ (इ सन १९६९) मध्ये स्थापन झाले मात्र त्याची तयारी २५ वर्षापासून चालली होती स २००० मध्ये पू भुवनवि आणि पू जबूवि महाराज (पूर्वाश्रमातील पितापुत्र) या गावी आले होते मानवाचे कर्तव्य, जिनेश्वर भगवताची पूजा, जिनमदिराची आवश्यकता अशा विषयावरील त्याच्या प्रभावी उपदेशाने येथे जिनमदिर करावयाचेच म्हणून श्रावकसमाजाने तीन हजार रु वर्गणी जमविली स २००५ मध्ये पू प. प्रवीण वि गणिवर्य, युवकजन प्रतिबोधक महिमासपन्न महिमा वि म व सुशिल वि म याच्या येथील मुकामात मदिर बाधणीच्या कामास पुन्हा चालना मिळाली यावेळी आणि चार हजार रु ची वर्गणी आणि श्री शातिलाल वडूचद शाह याचे नाक्यावरील घर याचा लाभ झाला परतु मदिराच्या पूर्णावस्थेचा योग नियतीने एकोणीस वर्षे पुढे ढकलला। शेवटी मदिर व उपाश्रयाचे बाधकाम पुरे होऊन स २०२५ मध्ये पू प रजन वि गणिवर्य

आदि आणि पू सूर्यमालाश्री आदि गुरुजनाच्या निश्रेत माघ शु।। १ ते शु।। ५ पर्यंत पचान्हिका महोत्सव, शातिस्नात्र करून श्री वासुपूज्य स्वामि आदि तीन प्रभूमूर्तीची प्रतिष्ठापना झाली, त्याच दिवशी पूज्यश्रींचे नूतन शिष्य पू राजेश वि म ची वडी दीक्षा झाली माघ शु।। १३ या दिवशी उपाश्रयाचे उद्‌घाटन सागली निवासी शेठ रतनमीभाई जेठाभाई शाह याच्या हस्ते झाले

श्रावकसमाजाची धर्मभावना प्रबळ असून येथील श्राविका श्री चपाबेन तुकाराम शाह यानी स २०२५ च्या पर्युषण पर्व समयी सागली मुकामी मासक्षमण तपश्चर्या केली

**३ इस्लामपूर** (ता वाळवा) सुमारे २८ हजार लोकसख्येच्या या गावात जैन श्वे श्रावक ६१८ आहेत राजस्थानी आणि गुजराती असे मिळून ८६ घरे आहेत. कापड, सराफी, किराणा व्यापार हा त्याचा व्यवसाय आहे. बाजार पेठेतील श्री वासूपूज्य भगवान मूळ नायक असलेले दुमजली शिखरवद मदिर ज्येष्ठ शु।। ५ स २००६ दिनाक २२ मे १९४० या दिवशी प पू प नवीनवि गणिवर्य (हल्ली पू पा आचार्यदेव) याच्या निश्रेत स्थापन झाले एक गृहमदिर आहे एक उपाश्रय आणि एक पचाचा वाडा आहे येथील श्रावकगण धर्म परायण आहे

**४ कौलापूर**

सागली तासगाव रस्त्यावर दोन्ही गावापासून सात मैलावर असलेल्या या गावची लोकसख्या १२ हजार आहे १५० वर्षांपूर्वी येथे श्रावकाची १५।१६ घरे सुखी, सधन अशी

**कौलापूर येथील जिनालयांतील प्राचीन जिनमूर्ती**



श्री पार्श्वनाथ प्रभु (स. १५३९) — श्री आदीश्वर भगवत (स १२६१) — श्री चद्रप्रभू स्वामि (स १७४५)

होती सध्या दोन घरे असून श्रावकसख्या ६ आहे

येथील श्री आदीश्वर भगवन्ताचे मदिर पश्चिम महाराष्ट्रात सर्वात जूने असून त्याची प्रतिष्ठा माघ शु॥ १३ स १९२१ रोजीं झाली श्री कुभोजगिरीवर जगवल्लभ पार्श्वनाथाची प्रतिष्ठा स १९२६ मध्ये झाली कौलापूर येथे मुळनायक आदीश्वर ( स. १२६१) श्री पार्श्व-नाथ (स १५३९ व श्री चद्रप्रभू (स १७४५) अशा प्राचीन प्रतिमाजी असून श्री चक्रेश्वरी माताजी व गोमुखयक्ष या सर्व सगमरवरी मूर्ती आहेत येथील एक सुश्रावक स्व लालचदभाई यानीं गाव सोडून जाताना आपली ९॥ एकर जमीन या मदिरास अर्पण केली आहे मदि-राच्या भोवताली खुली जागा असून सभोवताली तट बाधलेला आहे दरवाज्यावर एक दुमजली उपाश्रय आहे

या मदिराच्या जीर्णोद्धारासाठी सागली निवासी श्री शातिलाल लिलाचद शाह रेठरेकर यानी प्रयत्न केले सागली येथील श्री सोमचद मानचद शाह यांच्या नेतृत्वाखाली एक समिती स्थापन होऊन या कार्याला चालना मिळाली निपाणीचे श्रेष्ठिवर्य दत्तुभाई गणपतलाल जत्राटकार यानी ४००१ रु. देऊन या कार्यास सक्रिय उत्तेजन दिले. या कामी ठिकठिकाणच्या जैन मदिराच्या कडून व तसेच काही श्रावकाचे-कडून भरीव मदत लाभली आहे हे मदिर सागली येथील श्री पार्श्वनाथ देरासरजी ट्रस्ट-कडे वहिवाटीस देऊन त्या ट्रस्टमार्फत लौकरच प्रतिष्ठा महोत्सव होईल

कौलापूर गावाशेजारी विमानतळ असून तेथे लहान विमाने उतरू शकतात

**५ कामेरी (ता. वाळवा )** इस्लामपूरपासून ४ मैलावर हे गाव असून तेथील लोकसख्या ८ हजार आहे जै. श्वे श्रावकसख्या २० आहे

**६ कासेगाव (ता. वाळवा )** पच्याहत्तर वर्षांपूर्वी येथे श्रावक समाजाने अभिनदन स्वामीचे एक रमणीय शिखरबद देवालय बाधले हल्ली तेथे श्रावकाची ६ घरे असून व्यापार व शेती असा त्याचा व्यवसाय आहे

**७ खानापूर ( ता. खानापूर )** सुमारे ६ हजार वस्तीत श्रावकाची सख्या ५० आहे शेती व व्यापार हा त्याचा व्यवसाय आहे श्री काति-लाल गणेशचद शाह याचे श्री अजितनाथ भगवानाचे गृहमदिर आहे

**८ खेराडे बुद्रुक (ता. खानापूर )** लोक-सख्या ३५०० श्रावकाची घरे २ आहेत त्याचा व्यापार व्यवसाय आहे

**९ ताकारी ( ता. वाळवा)** मिरज पुणे रेल्वे मार्गावरील रेल्वे स्टेशन आहे तसेच तास-गाव कराड मार्गावर मोटार रस्त्याने येथे जाता येते लोकसख्या २२११ त्यात जैन श्वे समा-जाची घरे ९ व लोकसख्या ६२ आहे त्याचा किराणा व्यापार प्रामुख्याने आहे श्री शातिनाथ भगवानाची धातुची प्रतिमा असलेले गृहमदिर श्री रतनचद मगनचद पेठकर यानी स १९९० मध्यें स्थापन केले आहे

**१० तासगांव (ता. तासगाव)** या गावाची लोकवस्ती २० हजार असून जैन श्वे मू श्रावकाची सख्या २०० आहे त्याचा व्यवसाय व्यापार व शेती आहे श्री ऋषभदेव प्रभूचे शिखरबदी मदिर स १९४९ मध्ये झाले चौफेर विशाल जागा, त्यात विहीर बगीचा असून रस्त्याच्या कडेस एक दुमजली सुदर

उपाश्रय आहे मदिरात श्री ऋषभदेव, शाति-नाथ, अजितनाथ व श्री महावीर स्वामि याच्या लोभस प्रतिमाजी बिराजमान असून या मदिराची बाधणी पाहून श्री भोयणीजी तीर्थाची आठवण यावी असे बाधकाम झालेले आहे. धार्मिक समारभ व समाजाची कार्ये या दृष्टीने दोन प्रशस्त दालने, रसोडा घर, भोजनाची व्यवस्था, पाणी, दिवाबत्ती याची सोय अलिकडेच करण्यात आली आहे येथे नुकतेच 'जैन मित्र मडळ' स्थापन झाले असून त्याचे सर्व सभासद दररोज साय आरतीच्या वेळी जमतात धर्मकार्य आणि समाज कार्य याच्यात हे मडळ सहभागी असते. श्रावकगण धर्मपरायण आहे



**श्री ऋषभदेव जैन मंदिर व उपाश्रय तासगांव**

**११ दुधगांव (ता. मिरज)** सुमारे ७ हजार लोकवस्तीच्या या गावात सध्या श्रावकाची वस्ती १६ आहे

**१२ दुधोंडी (ता. तासगाव)** सुमारे ४ हजार लोकसख्येच्या या गावात श्रावक सख्या १० आहे श्रावकामध्ये धर्मभावना प्रबळ आहे दुधोंडी येथील शकरलाल छगनलाल शाह याच्या कन्येने ३० वर्षापूर्वी दीक्षा घेऊन त्या कैवल्यश्री साध्वीजी झाल्या आता शकरलालभाईची नात कु कैलास लौकरच दीक्षा घेणार आहे.

**१३ भवानीनगर (ता वाळवा )** लोकसख्या १७०० श्रावकाची सख्या ४१ असून व्यापार व शेती हा त्याचा व्यवसाय आहे

**१४ मनेराजुरी (ता. तासगांव)** येथे हल्ली श्रावकाचे एकच घर असून सख्या ९ आहे

**१५ माधवनगर (ता. मिरज )** सागलीपासून तीन मैलावरील या गावाची ११ हजार वस्ती असून जैन श्वे मू श्रावकाची ३१ घरे आहेत त्याचा प्रमुख व्यवसाय मुख्यत व्यापार आणि यत्रमागावर कापडाचे उत्पादन आहे

येथे मदिर बाधण्यासाठी सघाने घेतलेल्या जागेवर कोल्हापूर येथील गेनमलजी राठोड



**श्री अमीझरा वासुपूज्य स्वामी मदिर माधवनगर**

आणि त्याच्या पुत्रपरिवाराने श्री वासुपूज्य स्वामीचे शिखरबद देवालय स्वखर्चाने बाधून ते सघास अर्पण केले. त्याच्या परिवारातील १३ च्या सख्येस अनुलक्षून त्यानी १३ जिनबिंबे तयार करवून पू पा आ यशोदेवसूरीश्वरजी म च्या निश्रेत अजनशलाका करून त्याची प्रतिष्ठापना पू प रजनविगणिवर्य, ज्योतिषशास्त्र विशारद पू भद्रानद वि म याच्या निश्रेत आषाढ शु।। २ स २०२३ ता ९-७-६७ ला केली त्यावेळी अमी झरली (अमृत स्तोत्र झाला) म्हणून अमीझरा वासुपूज्य मदिर असे म्हणतात या मदिरालगतच एक उपाश्रय असून पाठशाळाहि आहे ४५ विद्यार्थ्यांना धर्मपाठाचा लाभ होतो

**१६ मिरज (ता. मिरज)** साउथ वेस्टर्न रेल्वे पुणे बंगलोर लाईनवरील हे जक्शन आहे येथील वानलेस हॉस्पिटल व तेथून ४ च मैलावर असलेले वानलेसवाडी येथील हॉस्पिटल महशूर आहे देशपरदेशचे रुग्ण उपचारासाठी येथे येतात येथील हवाहि उत्तम आहे वानलेस हॉस्पिटलसमोरच एक हिंदु धर्मशाळा सर्व सोयीनी युक्त अशी बाधलेली आहे

अदाजे ६० हजार वस्तीच्या या शहरात जैन श्वे श्रावकाची ३५ घरे व सख्या १७५ आहे. व्यापार उदीम हा त्याचा व्यवसाय आहे.

मनेराजुरी येथील स्व. बाळाराम पुरुषोत्तम शाह यानी अण्णाबुवा या साधूचे मदिर स्वखर्चाने शनिवार पेठेत बाधले तेथेच दुमजल्यावर मिरज येथील औषधोपचार निमित्ताने बाहेरगावाहून येणाऱ्या श्रावकाच्यासाठी कोल्हापूर येथून धातूची प्रतिमा आणून आषाढ शु।। १ सवत १९७२ रोजी जैन मदिराची स्थापना केली. नतर श्रावकाची सख्या वाढू लागली तशी मदिराच्या विस्ताराची गरज भासली नतर येथील श्रावक सघाने त्या मदिराची पुनर्रचना करून श्री वासुपूज्य, शातिनाथ आणि पार्श्वनाथ भगवन्ताच्या सगमरवरी मूर्ती आणून त्याची प्रतिष्ठापना केली यक्ष यक्षिणी, मणिभद्रजी याची स्थापना केली या मदिराची सर्व व्यवस्था सन १९५२ पासून मिरज सघाकडे सोपवण्यात आलीअसून त्याच्या विश्वस्त मडळावर स्व बाळारामभाई याच्या घराण्यापैकी एक विश्वस्त असावयाचाच असे ठरविले आहे. हल्ली सागली येथील आर टी शाह त्या विश्वस्तापैकी एक आहेत

**१७ विटा (ता. विटा)** सुमारे २० हजार लोकसख्या, श्रावक सख्या २६० विशेष करून व्यापार व्यवसायी येथे पू ललितविजयजी म श्रीच्या उपदेशाने श्री सभवनाथ भगवानाचे शिखरबद जिनालय स २०११ मध्ये झाले



श्री सभवनाथ मदिर, विटा

त्या मागे एक उपाश्रय आहे येथील श्री वर्धमान सेवा समिती समाजाच्या सर्व कार्यात सेवा देत असते सर्व विटेकर श्रावक पू ललित वि म याचे उपकार विसरू शकत नाही

**१८ शाळगाव (ता. विटा)** ४५०० लोकवस्तीच्या या गांवी श्रावकाची २ घरे असून सख्या १० आहे शेती व व्यापार हा व्यवसाय येथे दोन गृहमदिरे श्री अनतनाथ भगवानाचे स. २००७ व शांतिनाथ भगवानाचे स २०२१ मध्ये स्थापन झालेली आहेत येथे पू पा आ रामचद्रसूरीश्वरजी महाराज आपल्या शिष्यासह येऊन गेले आहेत

**१९ बत्तीस शिराळा** (ता. शिराळा) नागपचमीच्या उत्सवासाठी विशेष विख्यात असलेल्या ८ हजार वस्तीच्या या गावात श्रावकाची ११ घरे असून सख्या ९० आहे व्यापार आणि शेती असा त्याचा व्यवसाय आहे येथे पू. प नवितविजयजी गणिवर्य, (हल्ली आचार्यदेव) याच्या उपदेशाने श्री पार्श्वनाथ प्रभूचे गृहमदिर सन १९४८ साली स्थापन झाले त्यांचे शिष्य पू हिमाशु वि महाराज याची दीक्षा याच गावी झाली येथे तळमजल्यास उपाश्रय व दुमजल्यावर जिनालय बाधण्याची योजना आखून थोडेबहुत काम झाले आहे

**२० सांगली (ता. मिरज)**

जिल्ह्याचे ठिकाण हळद, शेग, गूळ, मिरची, तबाकू इत्यादी शेती माल तसेच किराणा, कापड, सराफी, हार्डवेअर वगैर मालाची मोठी बाजार पेठ औद्योगिक व इतर सहकारी प्रवृत्तीचे माहेरघर शिक्षणक्षेत्रातील प्रगतिपथावरील गाव हे गाव श्री कृष्णा नदीच्या तीरावर वसले असून लोकसख्या १ लाखापर्यंत पोचली

**श्री पार्श्वनाथ मदिर वखार भाग सांगली**



आहे जैन श्वे मू श्रावकाची २५० घरे असून हा समाज निरनिराळया व्यापार प्रवृत्तीत आहे

जिनमदिरे ३–(१) ज्या वेळी सागली येथे श्रावकाची ८।१० घरे होती तेव्हा येथील स्व. शेठ रतनचद साकळचद यानी अहमदावादहून श्री पार्श्वनाथ प्रभूची धातूची प्रतिमा आणून श्री गणपती पेठेतील आपल्या स्वतत्र अशा दुमजली घरात एक गृहमदिर ता ९।१२।१९०५ रोजी सघाच्या उपयोगासाठी स्थापन केले स्व शेठ बापूभाई रतनचद यानी हयातभर ते साभाळले व हल्ली ते मदिर त्याचे चि श्री मोहनलाल बापूभाई शाह यानी श्री पार्श्वनाथ जैन श्वे देरासर, वखारभाग, सागली याचेकडे सोपविले आहे

(२) सघ मदिर येथील श्रावक सख्या व शहराचा पसारा वाढत गेला तेव्हा सर्वशेठश्री स्व कालिदास रवचद, मानचद गुलाबचद, तुकाराम

देवचद, तुकाराम बाळाराम, चूनिलाल पोपट-लाल (फर्म), फकिरचद छेनाभाई, हिरालाल मोतीलाल परीख, ताराचद कस्तुरचद आदी नानावटी घराणे, भिकूभाई बापूचद इत्यादीच्या प्रयत्नाने वखारभागात हायस्कूल रोडवर जागा घेऊन तेथे एक दुमजली विशाल उपाश्रय बाधण्यांत आला. सप्रति महाराजकालीन श्री पार्श्वनाथ, कुथुनाथ आणि फणाधारी पार्श्व-नाथाच्या मूर्ती आणल्यानतर मदिर बाधून प्रतिष्ठा वैशाख वद्य ६ स २००५ रोजी पू पा कविकुलकिरीट व्या वा आचार्यदेव श्रीमद् लब्धिसूरीश्वरजी महाराज व त्याच्या शिष्य-वराच्या निश्रेत झाला त्यावेळी विमानातून पुष्पवृष्टि करण्यात आली होती

या मदिराची घटना व कामकाजाचे नियम श्री शातिलाल रेठरेकर यानी तयार केले व ते प पू महिमासपन्न महिमा वि म याच्या वाढ दिवशीं भाद्रपद वद्य १२ स २००५ रोजी सघाने मजूर करून त्याप्रमाणे कामकाज चालू आहे

या मदिरात श्री पार्श्वयक्ष, श्री पद्मावती देवी याच्या मुर्तीचीहि प्रतिष्ठापना झाली असून, कोल्हापूर येथील चुनिलाल कृष्णचद याच्या मार्फत आलेले श्री सिद्धचक्रयत्र आहे रगमडपात काचकामाने केलेले श्री शत्रुजयगिरी पट स्व. रावजी केशवजी आणि श्री अष्टापदजी व पावा-पुरीजी पट श्री शातिलाल रेठरेकर याच्या मार्फत केलेले आहेत धार्मिक उपकरणे, पाण्या-साठी बोअरिंग वगैरे सर्व सोयी उपलब्ध आहेत या मदिराच्या विकासकार्यात स्व शेठ फकिर-चद छेनाभाई याचा मोठा भाग होता

(३) श्री जैन श्वे पानाचद वसतिगृहाच्या तिसऱ्या मजल्यावर श्री सुपार्श्वनाथ मदिर स २०२३ ला स्थापन झाले असून त्याचीहि व्यवस्था सघ मदिराकडेच आहे

**उपाश्रय**—वखारभागातील सघ मदिरालगत एक दुमजली मोठा उपाश्रय, आतील भागात दुमजल्यावर एक लहानसा उपाश्रय आहे.

**पाठशाळा**—श्रीमद् लब्धिसूरीश्वरजी पाठ-शाळा स २००५ पासून चालू आहे तिला स्थैर्य प्राप्त व्हावे व तिचे कार्य अखडितपणे चालावे म्हणून स २०१९।२०२० मध्ये येथे चातुर्मास-स्थित पू प. शुभकर वि गणिवर्य (हल्ली पू पा आचार्यदेव) याच्या उपदेशाने कायम निधीची सुरुवात झाली गेल्या ६।७ वर्षात हा निधी ३८ हजारापर्यंत गेला आहे श्रावक सघानी या योजनेस उत्स्फूर्त प्रतिसाद दिला याकामीं श्री रतनसीभाई शामजीभाई राजपाल, जयतिलाल मणिलाल व इतर कार्यकर्ते प्रयत्न-शील आहेत

**वाडी–धर्मशाळा**—सागलीचा वाढता पसारा ध्यानी घेऊन येथील श्रावक सघाने धार्मिक सामाजिक वगैरे कार्यात उपयोगासाठी एक वाडी बाधावयाचे ठरविले सागलीचे श्रीमत स्व. राजेसाहेब यानी स्व शेठ चतुरभाई पितावर आदीच्या प्रयत्नाने आवराईच्या नाक्यावर एक मोठी जागा अल्पशा किमतीस दिली या कामास सक्रिय सुरूवात म्हणून शेठ रतनसी जेठाभाई शाह यानी आपले पिताजी काका आदि परिवाराच्या वतीने रु ३०५०१ ची देणगी दिली सघानेहि उदार वृत्तीने हातभार लावला असून अदाजे २।२॥ लाख रु चे हे काम लौकरच पुरे होईल

श्री जैन श्वे बोर्डिग

सन १९१५ मध्ये येथे श्री जैन श्वे बोर्डींग

सुरू करण्यात येऊन नतर ते श्री दक्षिण म. जै. श्वे प्रा. परिषदेकडे सोपविण्यात आले ५० विद्यार्थ्यांच्या सोयीसाठी अदाजे सव्वा लाख रु खर्चून एक तीन मजली इमारत बांधण्यात आली असून त्यास शेठ पानाचद मुळचद वसतिगृह असे नाव देण्यात आले आहे तिसऱ्या मजल्यावर जिनमदिर असावे म्हणून अकलूज निवासी श्री. भाईचद हेमचद व्होरा याच्या सक्रिय सहकाराने श्री सुपार्श्वनाथ मदिर झाले. त्याचा प्रतिष्ठामहोत्सव पू प रजनवि. गणिवर्यांच्या निश्रेत आषाढ शु।। २ स २०२३ ला झाला. या कामी सघाच्या श्री पार्श्वनाथ देरासरजीची विपुल मदत झाली त्या मदिराची व्यवस्था या देरासरकडेच आहे

उल्लेखनीय देणग्या ·

स्व. शेठ वालचद रामचद याच्या सुपुत्रानी माधवनगर येथील त्याचे सर्व सोयीनी युक्त असे घर माधवनगर जैन सघाच्या उपयोगासाठी सागली सघास अर्पण केले आहे

वखारभागातील मदिराच्या पूर्व बाजूस देवद्रव्यातून बांधलेल्या इमारतीमधील दुमजल्यावरील भाग साधारण द्रव्याचा होऊन त्याचा चतुर्विध श्री सघास उपयोग व्हावा म्हणून शेठ रतनसीभाई जेठाभाई शाह व त्यांच्या परिवाराने रु १५१११ रु दिले

याकामी पू ललितवि महाराज याचा उपदेश उपकारकारक झाला

इतर प्रवृत्ती

धार्मिक विधि विधान करणारे 'श्री पार्श्वनाथ मडळ' येथे स्थापन झाले असून शांतिस्नात्र प्रतिष्ठामहोत्सव, सिद्धचक्रपूजन अशा वेळी त्याचा उपयोग होतो. स्व. शेठ फकिरचद छेनाभाई गाधी यांचा या कामीचा ग्रंथसग्रह या मडळास मिळाला आहे.

महिला मडळ, युवक मडळ, कच्छी समाज मित्रमडळ अशा संघटना येथे आहेत.

श्री गुजराती सेवा समाज, सांगली

सागलीतील सर्व गुजराती भाषिकानीं एकत्र येऊन ही सस्था सन १९५४ साली स्थापन करून तिच्या मार्फत शेठ रतिलाल वि. गोसलिया बालमदिर, शेठ शिवाजी पुजा कोठारी प्राथमिक विद्यालय, मातोश्री गगाबाई शिवजीभाई माध्यमिक विद्यालय, सौ. कचनमाला र. गोसलीया ग्रथालय व वाचनालय त्याचबरोबर महिला मडळ, युवक मडळ चालवले आहे अल्पावधीतच या सस्थेने ३ लाख रुपयाची तीन मजली भव्य इमारत व एक मोठे क्रीडागण केले बालमदिर पासून एस् एस् सी. पर्यतचे सर्व शिक्षण विनाशुल्क देण्यात येते हा येथील विशेष आहे हल्ली येथे ७०० विद्यार्थी शिकतात प्रतिवर्षी सर्व गुजराती भाषिकाचे स्नेहसमेलन होते सेवा समाजातर्फे येथे एस् एन्. डी टी विद्यापीठ पुणे याच्याशी सलग्न असे महिला महाविद्यालय चालू करावयाचे ठरविले असून त्यासाठी येथील दानशूर स्व. बालचद रामचद याच्या सुपुत्रानी आपल्या मातोश्रीच्या नावे १ लाख ५१ हजार रुपये द्यावयाचा मनोदय व्यक्त केला आहे. सस्था विकासाचे टप्पे गाठीत असून येथील श्रावक वर्ग त्यात सहभागी आहे.

## ११ जिल्हा सोलापूर (महाराष्ट्र)

१ अकलूज (ता. माळशिरस) ३० हजार

लोकवस्तीचें हे गाव चौफेर साखर कारखान्यानी वेढलेले आहे गुजराती व राजस्थानी आणि स्थानकवासी अशी १५० श्रावक सख्या आहे. ते सर्व व्यापार आणि शिक्षण यात आघाडीवर आहेत येथून ११ मुले परदेशी जाऊन उच्च शिक्षण सपादन करून आली आहेत.

येथे मेनरोडवर श्री वासुपूज्य भगवानाचे जिनालय वैशाख शुद्ध ३ स २००० ला स्थापन झाले एक उपाश्रय आहे

२ बार्शी (ता. बार्शी) व्यापार व उद्योग याची वाढ होत असलेले साठ हजार वस्तीचे हे गाव सोलापूर जिल्ह्यातील एक महत्त्वाचे ठिकाण आहे जैन श्वेतावर याची १७५ कुटुबे व सख्या १३०० आहे सोमवार पेठेत भव्य व शिखरबद श्री ऋषभदेव जिनालय स. १९४१ (सन १८८५) स्थापन होऊन त्याचा प्रतिष्ठा महोत्सव स. १९७६ (सन १९२०) मध्ये झाला चालू वर्ष त्या मदिराचे सुवर्ण महोत्सवी वर्ष आहे येथील एस् टी स्टँडसमोर वदामिया भुवन मध्ये श्री मनमोहन पार्श्वनाथाचे एक गृहमदिर आहे

सन १९३३ पासून शेठ मुळचद जोयताराम पाठशाळा चालू असून १२५ मुले मुली तेथे अध्ययन करतात मुबई व पुणे येथून जैन तत्त्वज्ञान विषयक परीक्षा घेतल्या जातात

उपाश्रय, धर्मशाळा, सामाजिक कार्यासाठी मगल कार्यालय, शेठ दिपचद उर्फ बाबुभाई वखारिया याच्या देणगीतून त्याचे पिताश्री स्व शेठ रामचद मुळचद वखारिया जैन विद्याभुवन (वसतिगृह), शिवनाथ लुबाजी पोरवाल जैन पुस्तकालय, श्री आदीनाथ महिला मडळ, शेठ रामचद आणि स्व सौ चपाबाई रामचद शाह आयबिल खाते, श्री जैन महावीर मंडळ इत्यादि सस्था आणि संघटना सघातर्गत कार्यप्रवण आहेत

आपला समाज सार्वजनिक कार्यातही मागे नाही त्याच्या उदार देणग्यामुळे विविध सस्था बार्शीमध्ये यशस्वीपणे कार्य करीत आहेत शेठ मुळचद व जवाहरमल प्रायमरी स्कूल, शेठ नेणसी नरसी शाह आयुर्वेदिक दवाखाना, शेठ धारसी जीवन मॉडेल हायस्कूल, शेठ आगरचद कुकुलोण प्रशाला, सौ. हिराबाई नेणसी कन्या प्रशाला याचा उल्लेख या सदर्भात अटळ आहे

बार्शी सघातील श्रावक शिक्षणाच्या क्षेत्रातही मागे नाहीत. त्याच्या नोदवहीत ७ डॉक्टर्स, ६ इजिनिअर्स, ३ चार्टर्ड अकौटट्स्, ८ बी कॉम, ५ बी एस्सी १ एम् ए पी एच् डी, ३ ॲडव्होकेट्स् इत्यादि विविध क्षेत्रातील उच्च पदवीधराचा निर्देश आढळतो जैन समाजाने शिक्षणाच्या क्षेत्राची उपेक्षा करू नये

हाच एक सदेश जणू या मधून बार्शी सघ देत आहे

३ माढा (ता. माढा) ७ हजार वस्तीच्या या गावात श्रावक सख्या ८३ आहे व्यापार व शेती हा त्याचा व्यवसाय आहे येथे श्री मल्लिनाथ भगवानाचे एक मदिर व चद्रप्रभूचे एक गृहमदिर आहे

४ सोलापूर (जिल्हा सोलापूर)

महाराष्ट्रातील कापड उत्पादनाचे एक मोठे केंद्र, सेंट्रल रेल्वे व सदर्न सेंट्रल रेल्वेचे जंक्शन स्टेशन येथील जनसंख्या अंदाजे ३ लाख असून, येथे गुजराती, राजस्थानी कच्छी अशा श्रावक समाजाची १५० घरे आहेत, १००० समाज बांधव आहेत प्रामुख्याने त्यांचा कापडाचा व्यापार आहे

येथील मंगळवार पेठेत श्री आदीश्वर भगवंत विराजित एक भव्य शिखरबंद मंदिर आहे त्यास लगतच उपाश्रय आहे येथे पूर्वीपासून आयंबिल खाते चालू असून त्यासाठी एक नवीन इमारत बांधली आहे

# पुणे शहर व त्याचा उपनगर विभाग

संकलन —सोमचंद भाईचंद शाह, पुणे.



येथील श्री जैन श्वे मू संघाने निरनिराळ्या क्षेत्रात सर्वांगीण लक्ष पुरविलेले असून, अनेक कल्पनांनी युक्त अशा पुष्कळ संस्था उभारलेल्या आहेत त्यापासून आपल्या ठिकठिकाणच्या समाजास पुष्कळ तऱ्हेने मार्गदर्शन मिळेल असे वाटते

इतिहास कालापासून आतापर्यंत धार्मिक, सामाजिक, शैक्षणिक, औद्योगिक, राजकीय अशा सर्व क्षेत्रात नावाजलेले, अनेक विद्वान, अनेकविध कला, शास्त्रे इत्यादींचे अग्रेसर केन्द्र असलेले पुणे हे महाराष्ट्रातील प्रमुख शहर मुठा नदीच्या तीरावर वसलेले आहे हे रेल्वेचे जंक्शन, एस् टी मोटरीचे मोठे स्टेशन असून येथे विमानतळ आहे

छत्रपति शिवाजी महाराजांच्या अनेक पराक्रमाशी या गावाचा निकटचा संबंध आल्यानंतर, त्यांचे पंतप्रधान पेशवे यांनी येथे आपली राजधानी केली त्यानंतरच्या सर्व राजकर्त्यांनाही या शहराबद्दल आपुलकी वाटत आलेली आहे येथे इतिहास कालातील व आधुनिक कालातील अनेक प्रेक्षणीय वास्तु आहेत येथील लोकसंख्या १२ लाख आहे

पूर्व काळापासून येथे जैन श्वे श्रावकांची घरे बोटावर मोजण्याइतकी होती पेशव्यांनी येथे व महाराष्ट्रात व्यापार धंदा यांची वाढ होऊन, आपल्या राजधानीची वाढ व्हावी, जरूरीच्या प्रसंगी आपणासही पूरक व्हावे म्हणून देशोदेशीच्या धनाढ्य, व्यवहार आणि व्यापार कुशल व्यापाऱ्यांना येथे आणविले त्यात गुजरात, राजस्थान येथून आपला समाजहि मोठ्या संख्येने आला त्याने व्यापार उदीमाची वृद्धि करून समाज व दरबारात आदरणीय स्थान मिळविले

श्रावक समाजाची धर्मभावना तेवती होती. यति—गोरजी महाराजांचे येथे येणे जाणे असे चातुर्मासात हे श्रावक स्व-प्रांती जाऊन तेथे धर्माराधना, तीर्थयात्रा करून, चातुर्मास संपल्यावर इकडे येत. येथे दैनंदिन देव दर्शन पूजन होत नाही यासाठी हा समाज बेचैन असे

श्री गोडीजी पार्श्वनाथ जैन श्वे मंदिर वेताळ पेठ—गुरुवार पेठ, पुणे २

सुमारे १७५ वर्षापूर्वी येथील संघाने पुणे येथे एक जिनमंदिर बांधण्यासाठी पेशवे यांच्या-मार्फत त्यांचे धर्मगुरु शंकराचार्य यांना भेट—नजराणे देऊन परवानगी मागितली "हे मंदिर गावापासून दूर असावे, तेथील घंटारव बाहेर ऐकावयास येऊ नये म्हणून ते भुयारात बांधावे, त्याचे शिखर कळश, ध्वज येणाऱ्या जाणाऱ्यांना दिसू नयेत" इत्यादी अटी घालून परवानगी द्यावयाची तर द्या, असे शंकराचार्यांनी पेश-व्यांना कळविले

त्यावेळी पुणे लहान होते हल्ली फुले मार्केट आहे तेथे ओढा होता त्याच्या पलिकडे वेता-ळाचे मंदिर होते त्या टापूत जिनमंदिर बांधा-वयाचे तर बांधा असे सांगण्यात आले यति महाराजांनी 'जगल्यात मंगल' असे समजावून, तेथे भुयार करवून, श्री चिंतामणि पार्श्वनाथ प्रभु आदि विशालकाय प्राचीन पाच जिन-बिंबांची प्रतिष्ठापना श्री संघ समवेत सं १८५८ मध्ये करून भाविकाळासाठी धर्म आरा-धनेचे द्वार खुले करून दिले कालांतराने तळ-मजल्यावर श्री शंखेश्वर पार्श्वनाथ व त्या वरील मजल्यावर श्री गोडीजी पार्श्वनाथ प्रभु व इतर प्रतिमाजींची स्थापना झाली

पुढे या मंदिरासमोरच श्री ऋषभदेव भगवंत यांचे मंदिर बांधले जाऊन त्याची प्रतिष्ठा वैशाख सु॥ ६ सं १८९६ ला झाली सं २०१० मध्ये या मंदिराचा जीर्णोद्धार होऊन श्री शत्रुं-जय गिरीवरील 'दादाची टुकच जणू !' असे हे एक देवविमानतुल्य मंदिर झाले आहे या मंदिराचे बांधकाम जैन शिल्पशास्त्राप्रमाणे असून, येथे प्रत्येक ठिकाणी जैन इतिहास दर्शन घडविणारे कोरीव काम प्रेक्षणीय झाले आहे

आता हे मंदिर पुणे शहराच्या मध्यवर्ती ठिकाणी असून, येथील चौकास 'श्री पार्श्वनाथ चौक' असे नाव आहे. अलिकडेच येथील 'वेताळ पेठ' हे नाव बदलून त्यास 'गुरुवार पेठ' असे नामाभिधान झाले आहे

उपाश्रय —या मंदिरांतर्गत श्री लालजी महा-राज उपाश्रय व भगिनी वर्गासाठी एक उपाश्रय असे दोन उपाश्रय आहेत याशिवाय या मंदिरा-शेजारी असलेल्या श्री जैन दसाश्रीमाळी धर्म-शाळेचा जरूर पडेल त्यावेळी उपाश्रय म्हणून उपयोग केला जातो

पाठशाळा —येथे गेली ९० वर्षे पाठशाळा चालू आहे सन १९३७ साली तिचे 'लेडी लिलावती किकाभाई प्रेमचंद' असे नामकरण झाले या पाठशाळेत जैन धार्मिक अभ्यासासह इयत्ता १ ते ७ वी पर्यंतचे शिक्षण मोफत दिले जाते जैन व जैनेतर ६०० विद्यार्थी येथे शिक्षण घेतात या सर्व विद्यार्थ्यांना जैन एज्युकेशन बोर्ड मुंबई यांच्या कडून घेतल्या जाणाऱ्या परिक्षा द्याव्या लागतात या शिवाय दररोज रात्री मुलांच्यासाठी श्री जैन तत्त्वज्ञानोत्तेजक मंडळ येथे पाठशाळा चालविते. येथे २०० विद्यार्थी धर्म पाठ घेतात

आयंबिल खाते —येथे लेडी लिलावती किकाभाई आयंबिल खाते' संघामार्फत कायम चालू आहे

लायब्ररी —मंदिराच्या प्रवेशद्वारात श्री आत्मानंद जैन लायब्ररी' आहे येथे विपुल ग्रंथ संग्रह आहे

श्रीऋषभदेव जिन मंदिर, बानवडी —१०० वर्षापूर्वीचे मंदिर असून त्याची व्यवस्था या ट्रस्टमार्फत केली जाते

श्रीं गोडीजी पार्श्वनाथ मंदिराचा श्री जैन श्वे मू संघातर्गत काही संस्था

शेठ श्री कांतिलाल गगलभाई शहा वैयावच्च फंड —हा फंड या संघ मंदिराकडे असून त्यातून साधु, साध्वीजी महाराज यांचे वैयावच्च (व्यवस्था, सेवा सुश्रूषा) करण्यात येते

शेठ छगनलाल वालचंद गांधी जैन भोजन-शाळा।—जैन श्वे मू मध्यमवर्गीय व्यक्तींच्या साठी, त्याना परवडावे व जैन आचारधर्मास अनुसरून भोजन व्यवस्था व्हावी म्हणून ही भोजनशाळा चालू आहे

शेठ मणिलाल व केशवलाल माणेकचंद संघवी व मणिलाल चुनिलाल शाह जैन सहाय्यक फंड

जैन श्वे मू श्रावक श्राविकाना त्यांच्या परिस्थित्यनुरूप 'साधर्मि भक्ति' या तत्वा-नुसार या फंडातून आर्थिक साहाय्य केले जाते

श्री जैन श्वे युवक मंडळ, १११, गुरुवार पेठ

म २००१ मध्ये प पू प. चंद्र वि म श्रीच्या सदुपदेशाने धार्मिक, सामाजिक व राजकीय दृष्टचा संघटनात्मक कार्य करावयासाठी हे मंडळ स्थापन झाले यातील सभासदाचे 'प्रौढ' व 'स्वयंसेवक' असे दोन विभाग करण्यात आले येथील संघातील अग्रगण्य व्यक्ति व उत्साही तरुण मिळून अंदाजे २२५ सभासद आहेत त्यांनी आजवर पुष्कळ सेवाकार्य केले आहे

जैन विवाह विधी मंडळ —या युवक मंडळा-तील काही सभासदानी सन १९३० पासून आदि तीर्थंकर श्री ऋषभदेव प्रभूच्या पूर्वाश्रमी, त्याचा ज्या पद्धतीने विवाह झाला होता त्या जैन पद्धतीप्रमाणे आपल्या समाजात विवाह व्हावेत असा प्रचार केला, तसे विवाह विधी करणारे कार्यकर्ते तयार केले यात श्री सुमतीलाल मणिलाल (हल्ली मुंबई), प्रस्तुतचे संकलक वगैरेनी पुढाकार घेतला हल्ली ही पद्धति समाजात सर्वत्र रूढ होत चालली आहे समाजबंधूनीं निरलसपणाने चालविलेल्या या कार्यासाठी वर व वधु या पक्षानी विवाह समयीच्या उत्साहाने देणग्या द्यावयास सुरुवात केली या देणग्या 'जैन सहाय्यक फंड' या संस्थेस घेऊन तिच्या मार्फत निराधार, पंगु, वृद्ध, श्रावक श्राविका, विद्यार्थी याना गुप्तपणे सहाय्य देण्याचे कार्य चालू आहे

श्री वीर वनिता मंडळ १११ गुरुवार पेठ

म २००८ मध्ये ही स्वयंसेविकाची संघ-टना स्थापन झाली त्यानी पूजा गरबा नृत्य, जैन कथानकावरील नृत्य नाटिका याची तयारी केली ठिकठिकाणी होत असलेल्या धार्मिक उत्सवात त्यानी ही कला सादर करून सर्वत्र प्रशंसा मिळविली आहे—भगिनीवर्गात स्वावलंबी व्हावे म्हणून शिवणकलेचे शिक्षण या मंडळा-मार्फत देण्यात येते या मंडळाने खाकरे, पापड मसाले इत्यादि संसारोपयोगी सामान तयार करून ते विक्रीसाठी उद्योग व विक्री केंद्र चालविले असून तेथे दररोज अंदाजे ७५ भगिनी काम करतात.

इच्छा आहे पण अनुकूलता नाही अशा सुश्राविका आणि सूनांना या मंडळामार्फत तीर्थ-यात्रा करविल्या जातात

स्वाथ्य केन्द्र —

स २०१५ या वर्षी समाजातील ७१८ अग्रणीनी प्रत्येकी १००० रु देऊन, त्यातून फोटो, पाट, भाडी वगैरे साहित्य घेऊन, त्याच्या भाड्याच्या उत्पन्नातून साधर्मीना साहाय्य देणारे हे केन्द्र सुरू केले आहे

**श्री जैन श्वे मू दसाश्रीमाळी ज्ञाति मंडळ**

या ज्ञाति मडळाची १७५ कुटुंबे सभासद असून त्यानी गुरुवार पेठेत 'श्री दसाश्रीमाळी धर्मशाळा बाधून भाडी ठेवलेली आहेत मगल कार्यासाठी भाड्याने देतात ही धर्मशाळा सघ मदिराच्या जवळ असल्याने सघ कार्यास फार उपयोगी होते

श्री वखारिया पच महाजन।—

दसाश्रीमाळी व विसा पोरवाल ज्ञाति मडळीचे हे महाजन असून त्याची ४०० कुटुंबे येथे आहेत. या महाजनाची भाडी मोठ्या प्रमाणात आहेत

शेठ बेचरदास मानचद विसाश्रीमाळी महाजन वाडी

या विसाश्रीमाळी महाजनाचे २०० सभासद असून त्याची ही वाडी शुक्रवार पेठेत आहे

श्री गुजराती जैन विसा ओसवाल पच महाजन ९४९, गज पेठ, पुणे २

या महाजनाचे २५० सभासद असून त्याच्या या ज्ञाति सघटनेने जैन श्वे मू समाजाच्या उपयोगी व्हावी म्हणून एक वाडी–धर्मशाळा केली आहे येथे भाडी भरपूर आहेत

श्री पार्श्वनाथ चौकात विसा पोरवाल या ज्ञातीने बाधलेले तीन मजली 'श्री ऋषभदेव भगवन्त' जिनमदिर आहे.

श्री पार्श्वनाथ चौकाच्या पश्चिमेस श्री आदिनाथ चौक असून येथे येथील श्रावक समाजाने बाधलेले 'ओसवाल मदिर' म्हटले जाणारे 'श्री ऋषभदेव जिनमदिर' आहे हे मदिर विशाल, तीन मजल्याचे, शिखरबद्ध असून येथील प्रतिष्ठा स १९११ मध्ये झालेली आहे तळ मजल्यावर उपाश्रय आहे. या सघातर्गत 'श्री पार्श्वनाथ जैन सेवा मडळ' व श्री महावीर जैन सेवा मडळ या युवक सघटना आहेत

गृहमदिरे (१) शेठ केशवलाल व मणिलाल माणेकचद सघवी याच्या लक्ष्मीरोड वरील घरी 'श्री पार्श्वनाथ प्रभु' गृहमदिर आहे

(२) शेठ भिकुभाई रवचद शाह याच्या बुधवार पेठेतील घरी श्री चितामणि पार्श्वनाथ, वासुपूज्य स्वामि व चद्रप्रभु स्वामि याच्या प्रतिमाजी असलेले गृहमदिर आहे येथे उपाश्रय व ग्रथालय असून पाठशाळाही आहे दररोज १०० मुले मुली धार्मिक अभ्यासाचे पाठ घेतात

(३) शेठ मोहनलाल सखाराम शाह याच्या सदाशिव पेठेतील घरी श्री पार्श्वनाथ प्रभु बिराजित गृहमदिर आहे

**श्री जैन जागृति मडळ**

११६५ बुधवार पेठ पुणे २

श्री जैन श्वे समाजाच्या सर्वागीण उन्नतीचा प्रयत्न करावा म्हणून हे मडळ स २०१४ मध्ये

स्थापन झाले रुग्णाना लागणारे साहित्य विनामूल्य वापरावयास देतात, आपल्या समाजबधू भगिनी व विद्यार्थ्याना अडचणीच्या वेळी साहाय व्हावे म्हणून 'साधर्मि फंड' जमा करून, दिला जातो,

**कला कल्पना सर्कल धार्मिक व**
**सामाजिक हितकेंद्र**

१५८९ शुक्रवार पेठ पुणे २

३० उत्साही जैन श्वे युवकानी ही सस्था १५-८-६२ सुरु केली ही सस्था रु १५१-०० येथील सघाच्या साधारण खात्यास प्रतिवर्षी देते सस्थेच्या हौशी कलाकारानी 'कलकित सत्य' नाटक येथील समाजास विनामूल्य दाखविले 'जैन टेपल्स ऑफ इडिया' हा तीर्थयात्रा माहितीपट स्वखर्चाने तयार करून सर्वत्र दाखविला त्यास जिनीव्हा परिषदेमध्ये जागतिक **प्रथम क्रमांकाचें पारितोषिक मिळाले.** भगवान महावीराच्या जीवन चरित्रावरील रागोळी प्रदर्शन भरवून विनामूल्य दाखविले पुणे जिल्हयातील समाजाची शिरगणती करून येथील सघ मदिराकडे दिली

कोयना भूकप रिलीफ फडाला, 'सुदर मी होणार' या नाटक प्रयोगापासून मिळालेले रु ५०१ दिले गुजरात रिलीफ फडाला रागोळी प्रदर्शन भरवून मिळालेले रु ३५०० दिले धार्मिक व शैक्षणिक सहली अत्यल्प खर्चात करवण्याचा प्रयत्न चालू आहे

**फ्रेन्ड्स सर्कल-श्री जैन सेवा मडळ**

प्लॉट न १८-१९ रविवार पेठ पूणे २

पू मुनिश्री महानद वि म श्रीच्या प्रेरणेने २८ जैन श्वे युवकानी सन ११६४ मध्ये ही सघटना बाधली व लगेच जैन जनगणना केली, सन १९६५ मध्ये आपल्या देशाच्या सरक्षण निधीस नैवेद्य वगैरे वस्तु विकून मिळालेली रकम दिली, पुण्यातील ७०० हून अधिक विद्यार्थ्यांना शालोपयोगी साहित्य अल्प किमतीत व विनामूल्यहि पुरेवून तो उपक्रम चालू ठेवला आहे, 'समाजनी सेवामां' या विषयावर निबंध स्पर्धा ठेवून त्यापैकी निवडक निबधाची एक पुस्तिका प्रकाशित केली, सर्व धार्मिक कार्यात ही सस्था भाग घेतेच, शिवाय समाजोपयोगी अनेक योजना करावयासाठी ती प्रयत्नशील आहे

**भवानी पेठ, पुणे** – या भागात श्रावक समाज ४००० असून त्याचा अडत काम व टिंबरचा धदा आहे घर न २०३ भवानी पेठ येथे श्री पार्श्वनाथ भगवत मदिर सन १९५५ मध्ये स्थापन झालेले असून १ उपाश्रय आहे

शेठश्री वालचदजी शाह याचे एक गृहमदिर आहे येथे श्री जैन तत्वज्ञान मुलाच्या पाठशाळेमध्ये ४० मुले व स्त्रियासाठीच्या पाठशाळेमध्ये ५० भगिनी धर्मपाठ घेतात

**लष्कर, पुणें १.** — या भागात श्रावक सस्या १२०० आहे घर न ६५७ साचा पीर स्ट्रीट येथे दुमजली शिखरबद मदिरात श्री वासुपूज्य स्वामि मुळनायक आहेत या मदिरात सुदर असे काच काम केलेले आहे मदिराच्या समोर एक उपाश्रय, व मदिरालगत नवीन बाधकाम केलेला भव्य उपाश्रय असे दोन उपाश्रय आहेत शेठ ईश्वरलाल गुलाबचद पाठशाळा चालू असून १२५ विद्यार्थी धर्माध्यायन करतात येथे जैन सहायक फडाचे कार्य चालू आहे

**सोलापूर बाजार, पुणे १.** — पुण्याच्या या उपलगर विभागात श्रावकाची २२ घरे असून ते राजस्थानी आहेत त्याचा प्रामुख्याने सराफी व्यापार आहे मुख्य पेठेत मूळनायक श्री शातिनाथ प्रभु व बाजूस श्री अजितनाथ व धर्मनाथ प्रभूच्या प्रतिमाजी असलेले एक दुमजली जिन-

मदिर आहे लगतच उपाश्रय आहे पाठशाळा असून ६० मुले धर्म पाठ घेतात या सघातर्गत 'श्री शातिनाथ सेवा मडळ' ही युवक सघटना आहे

**येरवडा, पुणे** :—या उपनगराची लोकसख्या १० हजार असून श्रावक सख्या १५० आहे हे सर्व राजस्थानी असून सराफी कापड वगैरे व्यापार करतात येथे श्री सुविधि नाथ भगवत विराजमान एक लहानसे मदिर आहे येथील सघाने एक जागा घेतली असून, तेथे मदिर, उपाश्रय, पाठशाळा यासाठी तीन मजल्याच्या इमारतीचे बाधकाम सुरू होत आहे जागेच्या अभावाने ५० मुले शिकत असलेली पाठशाळा हल्ली बद आहे येथे 'श्री जैन अमोलक मडळ' नावाचे युवक मडळ आहे

**खडकी, पुणे ३.** —या विभागात लोकवस्ती ७० हजार असून श्रावक सख्या ७०० आहे येथील जुना बाजार या विभागात श्री मुनिसुव्रत स्वामि विराजित काच काम केलेले दुमजली मदिर स १९८८ मध्ये स्थापन झालेले आहे एक उपाश्रय आहे स २०११ पासून पाठशाळा चालू असून तेथे २५।३० मुले पाठ घेतात या शिवाय शा दलिचद धर्माजी जैन याचे श्री शखेश्वर पार्श्वनाथ गृह-मदिर आहे

**शिवाजीनगर, पुणे ५** —येथे श्री वी जे शाह याचे घरी श्री शातिनाथ प्रभू गृहमदिर आहे पानशेत धरण फुटले त्या महापुराने या मदिराचे बरेच नुकसान झाले पण येथे पाटावर असलेल्या तादुळाच्या स्वस्तिकाचा एक कणहि त्यावेळी हालला नाही हा चमत्कारच नव्हे काय ?

येथील श्राविका वर्गाने दोन वर्षापूर्वी उत्साही महिला मडळ स्थापले असून जैन सास्कृतिक कार्यक्रम उत्तम रीतीने बजविले आहेत

**दादावाडी, पुणे २.** —स्वारगेट जवळ निसर्ग रमणीय परिसरात 'दादावाडी मदिर' असून येथे श्री शत्रुजय गिरीची भव्य रचना, पादुका व्यायामशाळा, विहीर व बगीचा असून जागा विशाल आहे. येथील व्यवस्था उत्तम आहे

**श्री जैन तत्वज्ञान विद्यापीठ**

२१५।१६ बुधवार पेठ, पुणे २

प पू मुनिराज जितेन्द्रविजयजी महाराज याच्या प्रेरणेने व त्याच्या हस्ते या विद्यापीठाची स्थापना दि १४।५।१९४८ रोजी पुणे येथे झाली

जैन तत्वज्ञान व धार्मिक अभ्यासासाठी सोप्या व जनप्रिय भाषेतून पाठ्य पुस्तके प्रकाशित करणे, प्रातोप्राती प्रचार करून आवश्यक सूत्राच्या अर्थासह परिक्षा घेणे व गुणवत्तेनुसार शिष्यवृत्त्या देऊन ज्ञानपिपासू आबालवृद्धाना धर्माभ्यासासाठी उत्तेजन देणे असे धोरण असून या विद्यापीठाच्या ध्येयधोरणास सर्वत्रचे जैन श्वे. सघ व ज्ञानप्रेमी श्रेष्ठिवर्य हीमचदभाई कपुरचद शाह याचे सर्वांगीण साहाय्य लाभले आहे

विद्यापीठाने एकूण ६ परीक्षाचा अभ्यासक्रम आखलेला असून प्रतिवर्षी जुलै महिन्यात भारतातील तसेच परदेशातील नायरोबी, मोम्बासा, एडन, दारेसलाम, टागानिका, हरगेसा अशा १६५ केन्द्रातून अदाजे ५००० ते ५५०० विद्यार्थ्याच्या परिक्षा घेऊन विद्यार्थ्याना हजारो रुपयाच्या शिष्यवृत्त्या दिल्या आहेत तीस पेक्षा जास्त पाठ्यपुस्तके तीन भाषेतून प्रसिद्ध केली आहेत

परिक्षा देणाऱ्यात जैन जैनतर विद्यार्थी आहेत या सस्थेशी अदाजे ५०० पाठशाळा व विद्यार्थी वसतिगृहे सलग्न आहेत

धार्मिक शिक्षणाच्या प्रचारासाठी या विद्या-



**श्री गोडीजी पार्श्वनाथ मदिरांतर्गत श्री आदीश्वर मदिर पुणे २.**

पीठाच्या मुवई, वडोदा, जामनगर व देवास येथे शाखा असून सुरत, दहेगाम आणि हिंमतनगर येथे प्रचार केन्द्रे आहेत

मुलुड—मुवई येथे विद्यापीठाने 'विद्यापीठ भवन'चे वाधकाम मुरू केलेले असून तेथे कन्या छात्रालय, गृह उद्योग, वाल मदिर, लायवरी वगैरे विभाग सुरु करून तेथे अखड 'श्री नवकार मत्र जप' मुरू ठेवावयाचा असे ठरविले आहे

ही सस्था ट्रस्ट ॲक्टप्रमाणे रजिस्टर असून तिला दिलेल्या देणगीस इन्कम टॅक्स कायद्याप्रमाणे माफी मिळते

**श्री महावीर जैन विद्यालय, पुणे शाखा**

भारत सेवक समाज पथ, डेक्कन जिमखाना, पुणे ४.

येथील श्री जैन श्वे मघाने फर्ग्युसन कॉलेज जवळ एक विशाल जागा घेऊन 'श्री भारत जैन विद्यालय' हे ४० विद्यार्थी राहातील असे वसतीगृह स्थापन केलेले होते पुढे या वसतिगृहाचा विकास व्हावा या साठीं ते श्री महावीर जैन विद्यालय मुवई याच्याकडे सोपविले गेले येथे नवीन दुमजली इमारत वाधून नव्या व जुन्या इमारतीत महाविद्यालयीन शिक्षण घेणारे १२० विद्यार्थी राहतील अशी सोय झाली आहे येथे राहाणाऱ्या विद्यार्थ्यांना जैन धार्मिक अभ्यास करून परिक्षा द्याव्या लागतात येथे श्री पार्श्वनाथ प्रभूचें गृह मदिर आहे येथे प्राथमिक शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांपासून सोय व्हावी असे पुष्कळाना वाटते

**श्री आदिनाथ सहकारी गृहरचना सस्था मर्यादीत पुणे.**

पुणे सातारा रस्त्यावर सहकारी तत्वानुसार एक आदर्श वसाहत उभारण्याचे एक प्रचड काम या सस्थेमार्फत चालू आहे या सस्थेचा अभ्यास करण्यासाठी आपला देश तसेच परदेशातील अनेक व्यक्ति प्रतिनिधी मडळे या सस्थेस भेट देऊन गेली आहेत. यात आपल्या समाजाने मोठा भाग घेतलेला आहे

**श्री पूना गुजराती बधु समाज**

ही येथील सर्व गुजराती भाषिकाची सघटना येथील सास्कृतिक, सामाजिक क्षेत्रात सन १९१३ पासून कार्य करीत आहे या संस्थेने श्री त्रिवेदी अतिथीगृह , श्री मधुकात आमुलख छात्रालय, पोपटलाल स्मारक इत्यादि इमारती उभारून भरीव कार्य केले आहे पुणे येथे गुजराती शाळा, हायस्कूलस पुष्कळ आहेत यानहि आपल्या समाजाने मोठया प्रमाणात सक्रिय भाग घेतलेला आहे

पुण्याच्या सर्वांगीण विकासात इतिहास काळापासून गुजराती भाषिक समाज भरीव कार्य करीत आला आहे

# चोवीस तीर्थंकरांची माहिती

| तीर्थंकर | पिता | माता | जन्मठिकाण | जन्मनक्षत्र | उंची |
|---|---|---|---|---|---|
| १ ऋषभदेव | नाभीराजा | मरुदेवी | अयोध्या | उत्तराषाढा | ५०० धनुष्य |
| २ अजितनाथ | जितशत्रु | विजयादेवी | ,, | रोहिणी | ४५० ,, |
| ३ संभवनाथ | जितारी | सेना | श्रावस्ती | पूर्वाषाढा | ४०० ,, |
| ४ अभिनंदन | संवर | सिद्धार्था | अयोध्या | पुनर्वसु | ३५० ,, |
| ५ सुमतिनाथ | मेघप्रभ | सुमंगला | ,, | मघा | ३०० ,, |
| ६ पद्मप्रभ | श्रीधर | सुसिमा | कौशांबी | चित्रा | २५० ,, |
| ७ सुपार्श्वनाथ | सुप्रतिष्ठ | पृथ्वी | काशी | विशाखा | २०० ,, |
| ८ चंद्रप्रभ | महासेन | लक्ष्मणा | चंद्रपुरी | अनुराधा | १५० ,, |
| ९ सुविधिनाथ | सुग्रीव | रामा | काकंदी | मूळ | १०० ,, |
| १० शीतलनाथ | दृढरथ | नंदा | भद्रिकापुरी | पूर्वाषाढा | ९० ,, |
| ११ श्रेयांसनाथ | विष्णु | विष्णु | सिंहपुरी | श्रवण | ८० ,, |
| १२ वासुपूज्य | वसुपूज्य | विजया | चंपापुरी | शतभिषा | ७० ,, |
| १३ विमलनाथ | कृतवर्मा | श्यामा | कांपिल्य | उत्तराषाढा | ६० ,, |

डॉ. रविंद्र रा. दोसी, अर्जुननगर ( निपाणी )

| रंग | आयुष्य | गणधराची संख्या | निर्वाणस्थळ | पुढील तीर्थंकरा-मधील कालावधी | लंछन |
|---|---|---|---|---|---|
| सोनेरी पिवळा | ८४ लाख पूर्व | ८४ | अष्टापद पर्वत | ५० कोडा कोडी सागरोपम | वृषभ |
| ,, | ७२ ,, | ९० | समेत शिखर | ३० ,, | हत्ती |
| ,, | ६० ,, | १०५ | ,, | १० ,, | घोडा |
| ,, | ५० ,, | १०३ | ,, | ९ ,, | वानर–कपि |
| ,, | ४० ,, | १०६ | ,, | ९० हजार कोटी सागरोपम | क्रौंच |
| लाल वर्ण | ३० ,, | ११६ | ,, | ९ ,, | लाल कमळ |
| पिवळा | २० ,, | ९५ | ,, | ९०० कोटी सागरोपम | स्वस्तिक |
| गौरवर्ण | १० ,, | ९३ | ,, | ९० ,, | चंद्र |
| ,, | २ ,, | ८८ | ,, | ९ ,, | मगर |
| सोनेरी पिवळा | १ ,, | ८१ | ,, | अदाजे १ ,, | श्रीवत्स |
| ,, | ८४ लाख वर्षे | ७७ | ,, | ५४ सागरोपम | गेंडा |
| लाल | ७२ ,, | ६६ | चंपापुरी | ३० ,, | पाडा |
| सोनेरी पिवळा | ६० ,, | ५५ | समेत शिखर | ९ ,, | वराह |

| तीर्थंकर | पिता | माता | जन्म ठिकाण | जन्म नक्षत्र | उंची |
|---|---|---|---|---|---|
| १४ अनतनाथ | सिंहसेन | सुयशा | अयोध्या | रेवती | ५० धनुष्य |
| १५ धर्मनाथ | भानु | सुव्रता | रत्नपुरी | पुष्य | ४५ ,, |
| १६, शातिनाथ | विश्वसेन | अचिरा | हस्तिनापूर | भरणी | ४० ,, |
| १७ कुंथुनाथ | सूर्य | श्रीदेवी | ,, | कृतिका | ३५ ,, |
| १८ अरनाथ | सुदर्शन | मित्रादेवी | ,, | रोहिणी | ३० ,, |
| १९ मल्लिनाथ | कुंभ | प्रभावती | मथुरा | अश्विनी | २५ ,, |
| २० मुनिसुव्रत | सुमित्र | पद्मावती | राजगृही | श्रवण | २० ,, |
| २१ नमिनाथ | विजय | वप्रा | मथुरा | अश्विनी | १५ ,, |
| २२ नेमिनाथ | समुद्रविजय | शिवादेवी | शौरीपूर | चित्रा | १० ,, |
| २३ पार्श्वनाथ | अश्वसेन | वामादेवी | काशी | विशाखा | ९ हात |
| २४ महावीर | सिद्धार्थ | त्रिशलादेवी | क्षत्रियकुंड | उत्तरा फाल्गुणी | ७ ,, |

| रंग | आयुष्य | गणधराची संख्या | निर्वाणस्थळ | पुढील तीर्थकरां-मधील कालावधी | लछन |
|---|---|---|---|---|---|
| सोनेरी पिवळा | ३० लाख वर्षे | ५० | समेत शिखर | ४ सागरोपम वर्षे | सिचाणो |
| ,, | १० ,, | ४३ | ,, | ३ सागरोपमला ३/४ पल्योपम कमी | वज्र |
| ,, | १ ,, | ३६ | ,, | १/२ पल्योपम | हरीण |
| ,, | ९५ हजार वर्षे | ३५ | ,, | १/४ पल्योपमला ६ हजार कोटी वर्षे कमी | बकरा |
| ,, | ८४ ,, | ३० | ,, | १ हजार कोटी वर्षाला ६५, ८४, ००० वर्षे कमी | नंदावर्त |
| निळा | ५५ ,, | २८ | ,, | ५४ लाख वर्षे | कुंभ |
| श्यामल | ३० ,, | १८ | ,, | ६ ,, | कासव |
| सोनेरी पिवळा | १० ,, | १७ | ,, | ५ ,, | नीलकमल |
| श्यामल | १ ,, | १८ | गिरनार | ८४ हजार वर्षे | शंख |
| निळा | १०० वर्षे | १० | समेत शिखर | २५० वर्षे | सर्प |
| सोनेरी पिवळा | ७२ ,, | ११ | पावापुरी | — | सिंह |

# – श्री पंचासर पार्श्वनाथ स्तवन –

( श्री जिनेद्र स्तवनादी काव्य सदोहमांथी ) ( सारग )

कानमां, कानमा, कानमा, तारी कीरति सुणी मे कानमा तारी ॥धृ॥
घडी घडी मेरे दिलथी न विसरे, चित्त लाग्युं तुज ध्यानमां .. तारी
प्रतिहारज आठ अनुपम, सेव करे अेक तानमां, . तारी
वाणी पात्रीस अतिशय राजे, वरसे समकित दानमा, .. तारी
तुम सम देव अवर नहि दुजो, अवनीतल आसमानमा, . तारी
देखी देदार परम सुख पायो, मगन भयो तुम ज्ञानमां, . तारी
वामानंदन पास पचासर, परगट सकल जहानमा, .. तारी
जिन उत्तम पदसुं रग लाग्यो, चोळ मजीठ जिन ध्यानमां,.. तारी

---

# श्री पार्श्वनाथ प्रभुनी आरती

कर्ता– प पू उदयरत्नजी महाराजश्री (एक प्राचीन आरती)

जय जय आरती पार्श्व जिणंदा, प्रभु मुख सोहे पूनमचदा . जय
पहेली आरती अगर कपूरा, झगमग झगमग, ज्योति सनुरा . जय
बीजी आरती पार्श्व प्रभुनी, सौ मली कीजे भक्ति सलुणी जय
आरती कीजे अति उजमाला, झलहल झलहल झाक झमाला .. जय
मोहन मूरति नव करवाने, निरुपम ओपम नीलवाने .. जय
नव नव नाद मृदग न फेरी, वागत झलरी भूगलभेरी .. जय
वामा के सुत हृदयमा वसिया, आरती करता मन उल्हसीया ...जय
घट मनोहर मगलिक वाजे, सामळतां सौ सकट भाजे जय
आरती अरती दूर निवारे, मगल मगलदीप वधारे .. जय
अश्वसेन कुल दीपक पास, सेवकने दीयो समकित वास जय
धूप दीप धरता प्रभु आगे, परम उदयरत्न प्रभुता जागे जय

(सग्राहक– मोदी जयतिलाल नागरदास राधनपूरवाळा, कोइमतुर )

हे पार्श्वनाथ भगवन्त, आपले गुण ऐकताना कान पवित्र होतात,
ध्यान धरताना हृदयात निर्मळ प्रकाश पडतो :—

हे जगवल्लभ पार्श्वनाथ ! आपले दर्शन घेताना आमचे अंत:करण उल्हासित होते, शरीर पुलकित होते !

ज्याना पवित्रभावाने प्रणाम केला की
पापाचा प्रलय होतो व पुण्यसमूहाची
वाढ होते त दयासागर प्रभूच्या चरणी.



शहा चुनिलाल हरिसिंह राठोड
कापड व्यापारी व मनीलेंडर्स
गोकाक, जि. बेळगांव.

ज्याना पवित्रभावाने प्रणाम केला की
पापाचा प्रलय होतो व पुण्यसमूहाची
वृद्धि होते ते दयासागर प्रभूच्या चरणी



दक्षिण महाराष्ट्रना शत्रुंजयसमा
श्री जगवल्लभ पार्श्वनाथ स्थित श्री कुंभोजगिरी
तीर्थ शताब्दि महोत्सवने अमारी अनेकश वंदना



स्व. शा. खुबचंद शिवलाल
तथा
लिलाचंद वाडीलाल

: तरफथी :

हा. शा. बाबूलाल खुबचंद
अने
शा. महेंद्रकुमार लिलाचंद
धिणोजवाला
मुंबई

श्री जगवल्लभ पार्श्वनाथ,
कुभोजगिरी शताब्दि महोत्सवने
अ मा री व द ना

| | |
|---|---|
| शान्तीलाल धोंडीचंद शाह | कांतीलाल धोंडीचंद शाह |
| प्रेमचंद धोंडीचंद शाह | रतनलाल धोंडीचंद शाह |

रिखवदास धोंडीचंद शाह

# मे. कांतीलाल धोंडीचंद शाह

जनरल मर्चन्ट अँन्ड कमिशन एजन्ट

निपाणी, जि. बेळगाव. • फोन . ६८

## मे. के. डी. शाह सोलापुरकर

फॅन्सी कापडाचे प्रमुख विक्रेते

गुरुवार पेठ, निपाणी.

---

जेमणे कषायनी कालीमा दूर करी,
मोहराजने महात कर्यो एवा
वीतरागी श्री पार्श्वनाथ जयवता वर्ते

हिराचंद चतुरचंद दिवाणी
दीपक हिराचंद दिवाणी
अजितकुमार हिराचंद दिवाणी

# हिराचंद चतुरचंद दिवाणी

अ ड त दु का न

दलाल पेठ, निपाणी (जि बेळगाव)